वीणाप्रकाशन—१६

# स्वीकार

शरच्चंद्र केशव टोंगो




१ मे १९४१. किंमत दीड रुपया.

# प्रस्तावना

•••०◐०••

श्री. शरच्चंद्र टोंगो यांच्याशीं माझा फारसा परिचय नाहीं. सुमारें तीन महिन्यांपूर्वी 'महाराष्ट्र' कचेरींतील माझे सहकारी श्री. वि. ल. उळाभाजे यांनीं माझी त्याच्याशी ओळख करून दिली; व त्याच वेळीं त्यांच्या कादंबरीला प्रस्तावना लिहिण्याचेंहि काम माझ्यावर सोंपविलें. श्री. टोंगो हे कादंबरीकार म्हणून जरी प्रथमच वाचकवर्गापुढें येत असले, तरी 'वागीश्वरी', 'स्त्री' वगैरे नियतकालिकांतून त्यांच्या लघुकथा पूर्वीच प्रसिद्ध झालेल्या आहेत. त्याहिपेक्षां महत्वाची गोष्ट ही कीं, प्रो. फडके यांच्यासारख्या श्रेष्ठ रसज्ञानें त्यांच्या वाङ्मयगुणांचें कौतुक त्यांच्या लेखनाच्या अगदी सुरवातीच्या काळांतच केलें होतें. आठ नऊ वर्षांपूर्वी 'शोभना देशपांडे' या टोपण नांवानें श्री. टोंगो यांनीं येथील 'वागीश्वरी' मासिकांत 'रक्ताचा मोबदला' ही लघुकथा लिहिली होती. ती प्रो. फडके यांना इतकी कांहीं आवडली कीं, त्यांनीं लगेच 'वागीश्वरी'च्या संपादकांना पत्र लिहून ही गोष्ट म्हणजे एक 'दुर्मिळ रत्न' (rare gem) असल्याचें आणि 'शोभना देशपांडे' यांच्या सगळया लघुकथा वाचण्याचा आपण निश्चय केला असल्याचें कळविलें! श्री. टोंगो यांच्याविषयीं प्रो. फडके यांनीं काढलेल्या या उद्गारांवरून त्यांच्या लेखनकुशलतेची वाचकांना कल्पना येईल आणि ते ही कादंबरी उत्सुकतेनें वाचावयाला हातीं घेतील, याबद्दल मला शंका नाहीं.

आणि प्रस्तुत कादंबरी वाचल्यावर ती उत्सुकता अगदींच अनाठायीं होती असें वाचकांना वाटणार नाहीं, असें मी खात्रीनें म्हणूं शकतों. या कादंबरीची रचना विस्कळित आहे, तिच्या कथानकांत वेग असला तरी विकास नाहीं आणि तिची भाषाहि सदोष आहे, हें मी प्रथमच सांगून टाकतों. पण, मला वाटतें, एकाद्या तरुण कादंबरीकाराच्या पहिल्या कृतींत जे दोष सामान्यतः अपेक्षित असतात, त्यांहून अधिक दोष श्री. टोंगो यांच्या या कादंबरींत आढळणार नाहींत; व उलट निरनिराळ्या रसप्रसंगांचें चित्रण करावयाला लागणारी रसिकता,

तन्मयता आणि कल्पकता ही मात्र त्यांच्यांत प्रशंसनीय अशीच दृष्टीस पडेल. प्रस्तावनेंत उतारे देण्याची, अर्थात् काव्यसंग्रहांना हा नियम लागू नाहीं!—पद्धत नाहीं. तरीसुद्धां श्री. टोंगो यांच्या कल्पकतेची कल्पना यावी म्हणून मी तीन उतारे पुढें देत आहे—

......तिची ती साधी, सुंदर व कलावंताच्या आवडीनें ठेवलेली नीटनेटकी खोली त्या एवढ्या मोठ्या बंगल्यांत एखाद्या विशाल हृदयांत राहणाऱ्या नाजूक रहस्याप्रमाणें त्याला वाटली.

......झोपेंत बाजूच्या वीणेवर हात पडून त्या अचानक स्पर्शानें मधुर गीतलहरी उमटून जावी त्याप्रमाणें त्याला दया वाटली.

......दयेचें गाणें थांबलें. आणि मग सिंहासनाच्या पायऱ्या उतरून राजकन्या जाऊं लागतांच तिचें बहुमोलाचें राजवस्त्र उचलून तिच्या पाठोपाठ दासींनीं निघून जावें त्याप्रमाणें गाण्याच्या मागें रेंगाळणाऱ्या गीतलहरीही चालत्या झाल्या.

......मग त्याला हें माहीत नव्हतें काय कीं, प्रीति वटवाघुळाच्या एका जातीसारखी आहे. दंश करतांना ती आपल्या पंखांनीं हलुवार वारा घालते. त्यानंतरच्या यातना धड जगूंहि देत नाहींत अन् मरूंहा देत नाहींत!

ह्याच कल्पकतेचा नाजूकपणा त्यांच्या वर्णनांतहि दिसून येईल.

......तिचा नेहमींचा सैलसा अंबाडा ओघळून केस मोकळे सुटले होते. त्या केसांच्या काळ्याभोर रेषा पांढऱ्याशुभ्र चादरीवर विखुरल्या होत्या.

......कारण वर्षाऋतूंत पाण्याचे हबके बसल्यानें सगळी धूळ तलम पातळाप्रमाणें सृष्टीच्या अंगालगत चोपून बसली होती.

अशा प्रकारचीं कल्पकतापूर्ण, नाजूक वाक्यें या कादंबरींत विखुरलेलीं असून, त्यामुळें तिच्यांतील वर्णनांना मार्दव आणि सरसता आली आहे.

कादंबरीच्या कथानकाचा वेग आणि त्यांतील पात्रांची गर्दी ही मेलगाडीची आठवण देते; व मेलगाडीला जसे भयंकर अपघात व्हावे, तशा आकस्मिक दुर्घटना या कादंबरींतहि घडल्या आहेत. दुसरी गोष्ट अशी कीं, संध्येचें जें उपकथानक या कादंबरींत आलें आहे, त्याचें स्वारस्य किंवा आवश्यकता समजत

नाहीं. शिवाय, ' पतित्वाचें इमान ' या संदिग्ध शब्दप्रयोगानें या उपकथानकांत प्रारंभीं जो समजुतीचा घोटाळा उत्पन्न होतो, तो निराळाच. उलट, दया आणि आशा या दोन युवतींनीं या कादंबरींत रंग आणि वैचित्र्य उत्पन्न केलें असून, मनुष्यस्वभावाचे कांहीं नमुनेहि या दोन पात्रांच्या अनुषंगानें श्री. टोंगो यांनीं कुशलतेनें रेखाटले आहेत. प्रकाश, आशा, कॅ. मंत्री, फ्रँक गॉर्डन, मुजुमदार वगैरे पात्रांचीं वर्णनें रेखीव आणि स्वभावनिदर्शक आहेत. विशेषतः, हळुवार प्रणय-भावना सूचित करावयाला जी एक सूक्ष्म अशी लेखनचातुरी लागते, ती श्री. टोंगो यांना चांगली साधली आहे.

प्रस्तावना म्हणजे परीक्षण नव्हे. तरीसुद्धां श्री. टोंगो यांच्या या प्रथम कृतींतील कांहीं दोष मी स्पष्ट दाखविले आहेत. ते एवढ्याच हेतूनें कीं, त्यांच्या पुढील कृति अधिक निर्दोष आणि सरस उतराव्यात. कल्पकता, बारीक निरीक्षण, मनोव्यापारांचें दिग्दर्शन करण्याची हातोटी आणि भाषेचा नाजूकपणा हे कथा-लेखकाला अवश्य असलेले कांहीं गुण त्यांच्या या पहिल्या कृतींतच प्रतीत होतात; व त्या गुणांचा विकास जर त्यांनीं दक्षतेनें व्यासंगपूर्वक केला, तर त्यांना मराठी कादंबरीकारांच्या आघाडींत लवकरच स्थान मिळेल.

शांतानिवास, नागपूर
ता. १८-४-१९४१

ग. त्र्यं. माडखोलकर

---

# वीणा प्रकाशन



| | | | |
|---|---|---|---|
| (१) समरभूमि | प्रो. फडके | | १॥ रु. |
| (२) स्वैर विचार | माडखोलकर | | १॥ रु. |
| (३) दोन मनें | खांडेकर | | २ रु. |
| (४) कांता | माडखोलकर | | २ रु. |
| (५) आविष्कार | गीता साने | | १॥ रु. |
| (६) हेमलता | द्वा. वा. घाटे | | १ रु. |
| (७) पांढरे ढग | खांडेकर | | २ रु. |
| (८) निष्कलंक | कमल दिक्षित | | १। रु. |
| (९) विशाल जीवन | पी. वाय्. देशपांडे | | १। रु. |
| (१०) उषःप्रभा | मांजरेकर | | १। रु. |
| (११) झंझावात | बोकील | | २ रु. |
| (१२) पहिली लाट | खांडेकर | | १॥ रु. |
| (१३) साकी | बी. रघुनाथ | | १ रु. |
| (१४) मुखवटे | माडखोलकर | | २॥ रु. |
| (१५) काळी राणी | पी. वाय्. देशपांडे | | २॥ रु. |
| (१६) स्वीकार | शरच्चंद्र टोंगो | ( कादंबरी ) | १। रु. |
| (१७) आव्हान | माडखोलकर | | १। रु. |
| (१८) साहित्य आणि संस्कृति | स. खु. पांडे | | १॥ रु. |
| (१९) फुलें आणि कांटे | वि. स. खांडेकर | | १॥ रु. |
| (२०) नवीं मूल्यें | पी. वाय्. देशपांडे | | १॥ रु. |
| (२१) माझा लढा | अडोल्फ हिटलर | | ३ रु. |
| (२२) डाक बंगला | माडखोलकर | | |
| (२३) मोंगल दरबारांतील रहस्यें | देशपांडे | | |
| (२४) सुनीतीचे प्रियकर | पु. भा. भावे | | |
| (२५) एकांकिका | अनंत काणेकर | | |
| (२६) ? | उमाकांत भेंडे | ( कादंबरी ) | |
| (२७) चार भिंती | खांडेकर | | |

कै. वा. बाळाभाऊ देशपांडे

इजारदार (दिप्रस)

यांच्या स्मृतीस

कृतज्ञतापूर्वक—

ही माझी कादंबरी लिहून प्रसिद्ध होईपर्यंत ज्या माझ्या स्नेह्यांनीं व सुहृदांनीं मदत केली त्या सर्वांचा मी अतिशय आभारी आहे. विशेषतः श्री. भाऊसाहेब माडखोलकर, श्री. बाबुराव उळाभाजे, श्री. कुशाभाऊ देशपांडे, (दिग्रस) व श्री. राजाभाऊ गर्गे ह्यांचा येथें कृतज्ञतापूर्वक उल्लेख करतों.

"सदर कादंबरींत दया जी कविता म्हणते ती माझे स्नेही श्री. वा. ना. देशपांडे यांची आहे. त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे."

—शरच्चंद्र टोंगो

# १

## एक प्रश्न--

मॅजिस्ट्रेटनें प्रतापला साक्षीदार म्हणून सही करायला सुचाविलें. आपल्या अंगठीच्या लकाकणाऱ्या पाणीदार खड्याकडे लावलेली नजर वर करून त्यानें बाजूला उभ्या असलेल्या संध्येकडे नी उल्हासकडे पाहिलें. किंचित् हंसून मग त्यानें सही केली.

तो हंसला तो स्वतःच्या विचारमग्नतेला! क्षणभराच्या विचारांत तो विसरून गेला होता कीं, आपण उल्हासतर्फे उल्हास--संध्येच्या लग्नाच्या नोंदणी-साठीं साक्षीदार म्हणून आलों आहोंत. क्षणभर तो हेंही विसरला कीं समोर लग्न नोंदणारे अम्मलदार बसले असून जवळच उल्हास अन् संध्या उभे आहेत.

फक्त तो एकच विसरला नाहीं.

नव्हे, तें विसरतां न आल्यानेंच विचारांचें वादळ त्याच्या मस्तकांत भिरभिरूं लागलें.

उल्हासचं मुख इतकं भकास का?

उल्हास नी संध्या जवळजवळ उभे होते. तिच्या सांवळया पाणीदार देहांतून अपूर्व सौंदर्य ओसंडत होतें. तिचे विशाल डोळे सगळया वस्तूंना अवखळपणानें न्याहाळत होते. तिच्या टवटवीत मुखावर अस्फुट आनंदाची कांती खेळत होती. आणि तिच्या सगळया हालचालींतून यौवनाचा उन्माद आणि अधीरपणा दिसून येत होता.

तिच्या शेजारीं उल्हास उभा होता. तो उल्हास आहे हें प्रतापला माहित नसतें तर तो त्याला एखाद्या पुतळयाप्रमाणें खास भासला असता. वर्णानें तो संध्येपेक्षां खूपच गोरा होता. परंतु त्याच्या मुखावर निरोगी पिवळसरपणापेक्षां फिक्कट शुभ्र रंगाच्या छटाच अधिक खेळत होत्या. त्याच्या उंच देहयष्टीनें तो अधिकच रोड दिसे तशांत त्याच्या गालाचीं हाडेंही इतक्यांत बरींच वर आलेलीं दिसत होतीं.

ज्या क्षणाला उल्हासनें नंदनवनांतलें सुख तुच्छ मानायला पाहिजे त्या क्षणाला त्यानें इतकें खिन्न कां व्हावें हें प्रतापला समजेना.

हे सगळे विचार पुन्हा एकवार प्रतापच्या मनांत येऊन त्याला राहून राहून वाटू लागलें, ' उल्हासचं मुख इतकं भकास कां ! '

प्रतापनें सही केली. मॅजिस्ट्रेटनें त्यानंतर वधुवरांचें शुभ चिंतिलें, मग ते दोघे मोटारमध्यें येऊन मागे बसले व प्रताप गाडी हांकलावयास बसला.

तरी उल्हासच्या मुखावर बदल दिसेना !

गाडी पूर्ण वेगानें उल्हासच्या बंगल्याकडे नेताना वाटेंत प्रतापनें विचारलें,

उल्हास आतां आमच्या ह्या वहिनी झाल्यात. परंतु त्यांची रीतसर ओळख करून नाहीं दिलीस ! '

' यस्, यस्, आय् ॲम सो सॉरी......प्रताप, संध्या

ही ओळख करून संध्येचें नांव घेतांना तो हंसला. परंतु तें हंसणं मोठें भेसूर होतें. जणूं काय तें हास्य त्यानें जिवाच्या मोलानें विकत घेतलें होतें !

प्रतापनें एक ओझरता दृष्टीक्षेप टाकून मागें पाहिलें.

संध्या मोठ्या आनंदानें हसली होती. उल्हास झपाट्यानें निघून जाणाऱ्या झाडांकडे शून्य दृष्टीनें पाहत होता.

उल्हासची उदास मनःस्थिती संध्येच्या ध्यानांत येऊं नये म्हणून प्रतापनें विचारलें,

'वहिनी, तुम्ही इथंच शिकत होतात नाही कां?'

'होय इथंच. वुइमेन्स कॉलेजांत.'

'यंदा डिग्री मिळायची असेल, तुम्हांला?'

'होय.'

'छान. म्हणजे आपण सगळेच यंदा मिळून कॉनव्होकेशनला आहोंत तर. तुमचे विषय कोणते होते बी. ए.ला?'

'संस्कृत नी इकॉनॉमिक्स.'

'वा, छान. मग एम्. ए.च्या तयारीसाठी घरूनच मदत मिळेल तुम्हांला. उल्हास इकॉनॉमिक्समध्यें एम्. ए. आहे.'

'बघायचं आतां. माझी इच्छा असली तरी माझ्या इच्छेवरच कां निव्वळ अवलंबून आहे प्रताप भाऊजी? दुसऱ्या कुणाची तरी इच्छा असेल तरच शक्य होईल तें.'

तिनें चोरून उल्हासकडे पाहिलें. प्रताप व संध्या यांवर मनमोकळेपणानें हंसले. त्यांच्या हसण्यांत उल्हासही सामील झाला खरा. परंतु त्याचं बदसूर हास्य ऐकून प्रताप कांहींसा दचकला.

घरीं आल्यानतर उल्हासनें आपला बाहेरचा पोषाख उतरून त्याच्या नातेवाईकांना नमस्कार केला. त्याला आई अगर वडील नव्हते. त्याशिवाय फारशी पाहुण्यांची गर्दीही नव्हती अन् असली तरीही त्या गर्दीचा उपसर्ग टाळून एकटं राहण्याइतकें तें घर मोठें होतें.

म्हणून उल्हास प्रतापला म्हणाला,

'हें पहा प्रताप आतां तीन वाजताहेत. जरा वेळानं तूं मी अन् ही आपण च्हा घेऊं. तोंपर्यंत मी जाऊन पडतों. अन् जर तिकडे गोंदूमामा किंवा दुसरें कुणी माझी चौकशी करतीलच तर त्यांना सांग कीं, माझी प्रकृती बरी नाहीं... माफ कर हं.'

असें म्हणून तो घाईघाईनें निघून गेला.

आतांतर प्रतापला अधिकच बेचैन वाटलें.

त्याची उल्हासशी मैत्री होऊन सहा वर्षे झालीं होतीं. परंतु आजच्या इतका उल्हास उदास नी खिन्न यापूर्वी कधींच झालेला त्याला आढळला नाहीं. प्रताप मॅट्रीकची परीक्षा पास झाल्यानंतर नागपूरला कॉलेजांत शिकायला आला. त्यावेळीं त्याची उल्हासशीं वर्गात ओळख झाली. लवकरच त्या ओळखीचें रूपांतर त्यांच्या अकृत्रिम स्नेहांत झालें.

याचीं कारणें अगदींच स्पष्ट होतीं. उल्हास अन् प्रताप यांची सांपत्तिक स्थिती, त्यांचीं मतें, त्यांच्या आवडीनिवडी ह्या इतक्या एकसारख्या होत्या कीं जणूंकाय एकाच घरांत आणि एकाच संस्कृतींत ते लहानपणापासून एकत्र वाढत आले असावे अशी कुणाचीही समजूत व्हावी.

प्रताप जितका उमद्या मनाचा तरुण होता तितकाच उल्हास होता. प्रतापचे वडील माणिकराव हे श्रीमंत व सज्जन मालगुजार म्हणून माहित होते तितकेच उल्हासचे कैलासवासी वडील ॲडव्होकेट संभाजीराव हुषार व श्रीमंत वकील म्हणून नागपूरांत प्रसिद्ध होते. ते दोघेही आपल्या वडिलांचे एकुलते एक चिरंजीव असल्यानें क्वचित्च वाट्याला येणारें श्रीमंतीचें सुख त्या दोघांनाही मिळत होतें.

परंतु.........!

सुमारें दोन वर्षांपूर्वी ॲडव्होकेट संभाजीराव न्यूमोनियानें आजारी पडून मातृहीन उल्हासला पोरके करून गेलेत. अन् तेव्हांपासून तो सारखा उदास दिसूं लागला. त्याच्या ओंठावरचें हंसू ओघळून खालीं पडलें अन् चिनीमातीच्या एखाद्या पुतळ्याप्रमाणें फरसबंदी जमिनीवर पडून त्याचे तुकडे तुकडे झाले.

तें हास्य प्रतापला पुन्हा कधींच आढळलें नाहीं.

प्रतापला हें आठवून मोठा खेद झाला. त्यानें मग मनाशी कांहींतरी निश्चय केला आणि जिना चढून तो उल्हासच्या खोलीच्या दाराशीं गेला.

मनाची खळबळ त्यानें मोठ्या कष्टानें दावून दरवाजाला हळूच धक्का दिला.

उल्हासनें दार उघडलें, प्रतापला आंत घेऊन तो म्हणाला,

'तू कां? मला वाटलं............'

'काय वाटलं? संध्या वहिनी.........'

'हं, असच कांहींतरी .........'

खोलीच्या एका कोपऱ्यांत आपली नजर रोखून प्रताप म्हणाला.

'आतां साडेतीन वाजताहेत. मेल चार छप्पनला जातं. माझा विचार मेलनं जायचा आहे.'

'वा, वा मोठा शहाणाच कीं नाहीं. आतां मेलनं जायचं तर मग आलासच कशाला? तं कांहीं नाहीं तुला पंधरा दिवस ठेवून घेणार.'

'तुला हें बोलणं शोभतं. पण तसं राहणं मला शोभायचं नाहीं, नाहीं कां! माझं लग्न झाल नसल तरी पहिल्या भेटींची अतृप्त उत्कंठा तृप्त व्हायला किती दिवस लागत असतील याची कल्पना आहे मला.'

त्यावर प्रतापच्या दोनही खांद्यांना गदगदा हलवून आपले निस्तेज घारे डोळे त्याच्या मुखाकडे लावून उल्हास घाईघाईनें म्हणाला,

'हें पटत नाहीं मला. विवाहाच्या या मंगलकालीं तूं माझ्यापासून दूर असावं ही कल्पना मला सहनच होत नाहीं.'

'पण त्याचं अस आहे, कांहींही म्हटलं तरी तिसऱ्या माणसाची अडचण ही होणारच—'

उल्हासनें त्याच्यापुढें प्रतापला बोलूंच दिलें नाहीं.

कांहीं क्षणाच्या शांततेनंतर प्रतापनें विचारलें,

'उल्हास, तुला पटण्यासारखी माझी एक विनंती आहे.'

'काय ?'

'मला असं वाटतं तूं अन् संध्यावहिनी माझ्याबरोबर आपल्या मालगुजारीच्या गांवीं चलावं. सुखाचे अपूर्व क्षण या नागरी वातावरणांत उपभोगण्यापेक्षां तिथं तुम्ही चला. सुखाची लज्जत शहरापेक्षां खेड्यांतच पुष्कळदां अधिक कळून येते.'

त्यावर उल्हास हंसला.

'कां हंसलास ?'

'मला हंसायला आलं तें या गमतीच्या योगायोगाचं. माझाही विचार तुझ्या गांवींच यायचा होता. तुला कळायचं नाहीं प्रताप, परंतु मला माणसांची वर्दळ मुळींच आवडेनाशी झाली आहे. असं वाटतं, दूर कुठंतरी जावं कीं जिथं माणसांचे आवाज योगायोगानंच कानीं पडतील.'

बोलतां बोलतां उल्हासचे डोळे पाण्याने भरून आले.

कसल्या तरी धुमसणाऱ्या दुःखाचे चटके त्याच्या हृदयाला बसत होते. आपल्या जिवलगांना सांगून दुःखाचा क्षोभ हलका करून घेण्यापेक्षांही अधिक कठीण असें त्या दुखाचं स्वरूप असलं पाहिजे हें प्रतापनें ओळखलें. आपल्या पांढुरक्या नी क्षीण मनगटावर चकाकणाऱ्या घड्याळाच्या सांखळीशीं तो खेळत होता. प्रतापनें त्याच्या कुरळ्या केसांवरून आपला हात फिरवला.

'उल्हास, किती त्रास करून घेतोस स्वतःला. दुःख हें एकट्यानें गिळायचं नसतं. तुझा स्नेही या नात्यानं तुझ्या सुखदुःखावर, सुखापेक्षांही दुःखावर माझा अधिकार पोंचतो, नाहीं कां ? मोकळ्या मनानं तूं मला सगळं सांगशील कां ?'

त्यांवर उल्हासच्या मनाचा मोठा गोंधळ उडाला. आंसवांनीं काठोकाठ भरलेल्या डोळ्यांतून त्यानें आपली क्षीण नजर प्रतापच्या मुखाकडे लावली व कांहीं क्षणानंतर तो म्हणाला,

'नाहीं, तेवढं मला विचारूं नकोस प्रताप, तेवढंच मला विचारूं नको.'

असें म्हणून त्यानें प्रतापच्या मांडीवर आपलें मस्तक टेकवून एक असहाय हुंदका दिला.

× × ×

आतां सूर्यास्त झाला होता. जुलै महिन्यांतले ते दिवस असल्यानें पावसाळ्यांतल्या सुरवातीच्या जलधारा मोठ्या आल्हाददायक वाटत होत्या. जमिनीच्या काळ्याशार नांगरलेल्या मातींतून गवताची नाजूक नाजूक पाती उगवली होती. लांबवर दिसणाऱ्या डोंगरांच्या अस्पष्ट ओळीमागें मावळत्या सूर्याचीं तेजस्वी किरणं प्रकाशत होतीं. तेवढ्यानेंच जेवढे डोंगर स्पष्टपणानें उठून दिसतील तेवढेंच! बाकीच्या डोंगरांचे सौम्य निळसर रंग पावसाळ्यांतल्या त्या धूसर संध्याप्रकाशांत विलीन होऊन दिसेनासे झाले होते.

प्रतापच्या गांवीं त्यांचा बंगला मोठा डोलदार होता. बंगल्यासाठीं म्हणून माणिकरावांनीं त्या विस्तृत गांवाच्या मध्यभागीं असलेला उंचवटा पसंत केला होता. बंगल्याच्या भोंवतींचा सगळा उंचवटा माणिकरावांनीं साफसूफ करून घेतला होता. त्या उंचवट्यावर दगडाचा लहानसा खडाही राहणार नाहीं इतपत त्या उंचवट्याची रोज साफसूफ होई. बंगल्याच्या मागें रानवेलींची नी फुलवेलींची नुसती गर्दी झाली होती.

अशा त्या रम्य अन् निवांत जागीं उल्हास, संध्या आणि प्रताप आज सकाळींच आले होते. प्रतापनें अगोदर आपल्या वडिलांना कळवून दिलें असल्यानें त्या नवपरिणित दांपत्याच्या सरबराईत यत्किंचितही उणीव नव्हती. आज सकाळपासून तर संध्येच्या सावळ्या मुखावर उत्साहाच्या लकेरी सारख्या दिसून येत होत्या.

संध्या, उल्हास अन् प्रताप माडीवरच्या शृंगारलेल्या दिवाणखान्यांत बसले असतां प्रताप म्हणाला,

'वहिनी, तुम्हांला थंडी नाहीं वाजत?'

'छे, मुळींच नाहीं.'

'अन् तुला उल्हास?'

'त्याहून नाहीं.'

'आश्चर्य आहे. मग मलाच इतकं कां हीव भरावं? मला वाटतं गरम गरम कॉफी घेतल्यानं जरा बरं वाटेल.'

त्यांवर मोकळेपणानें हंसून संध्या म्हणाली,

'कॉफी घेण्यासाठीं केवढी प्रस्तावना केलीत तुम्ही. थांबा ह, मी खालून घेऊन येतें पेले........'

मग संध्या घाईघाइनें खालीं पळाली.

त्याची खात्री करून घेऊन उल्हास म्हणाला, 'आज लवकर जेवणाचं व्हायला पाहिजे. आजच्या प्रवासानं माझं शरीर अगदीं आंबून गेलं आहे. रोजच्यापेक्षां आपण लवकरच झोपूं या.'

'तुमचं तुम्ही पहा. मी मात्र लवकरच झोंपणार आहे.'

'म्हणजे याचा अर्थ काय प्रताप'

'याचा अर्थ अगदीं स्पष्ट आहे. आजची चवथी रात्र आहे तुझ्या लग्नानंतरची. गेल्या तीन रात्रीं तूं नी मी एकाच खोलींत झोपत आलों. संध्येला काय वाटत असेल? ती हंसते. ती स्त्री आहे म्हणूनच रडतांनाही हंसूं शकते. मी तुझं ऐकणार नाहीं. उल्हास......'

उल्हास शून्य नजरेनें गच्चीवर जाऊन उभा राहिला. गांवाशेजारीं वसलेल्या लमाण्याच्या तांड्यांत मरी आईच्या देवळांत आरतीसाठीं नगारा वाजत होता. त्याचा गंभीर व प्रसन्न निनाद दुरून ऐकूं येत होता. दुसऱ्या दिशेला वसलेल्या कोलांबपोडांतून उंच घोगऱ्या स्वरांत कुणी एकजण लावणी म्हणत होता.

त्यानें मागें वळून प्रतापकडे पाहिलें. तो एका नोकराला सांगत होता,

'हार तयार करून ठेव. गुलाबाच्या पाकळ्या पलंगावर टाकून दे अन् हे बघ पानतांड्यांतून कोंवळीं कोंवळी पानं विड्यासाठीं काढून आण...'

त्यानंतर संध्या कॉफीचे पेले घेऊन आली.

रात्रीं जेवण आटोपल्यानंतर आपल्या खोलींत जाण्यापूर्वी प्रतापनें उल्हासचा हात स्नेहभरानें दाबला.

'आय विश् यु हॅपी नाईट, उल्हास.'

मग तेथें प्रताप फार वेळ थांबला नाहीं. त्यानें उल्हासच्या खिन्नतेबद्दलचे तर्ककुतर्क काढणें बंद केलें. कारण आज उल्हास आयुष्यांतील अत्यंत नव्या आणि मोहक दालनांत प्रवेश करणार होता. म्हणून प्रतापनें ठरवलें कीं, ज्या दरवाज्यांतून तो या दालनांत प्रवेश करणार होता त्या दरवाज्याची सांखळी लावून घ्यायची,... त्याच्या पूर्वायुष्यांत मुळींसुद्धां पाहावयाचें नाहीं.

दुसरे दिवशीं सकाळीं प्रताप मोठ्या उत्साहानें उठला.

चहा घेतांना त्यानें संध्येकडे पाहिलें. ती कालच्या मानानें एकदम अबोल झाली होती. शिवाय तिचे टपोरे डोळे रडून रडून सुजले होते.

प्रतापला समजेना. तो गोंधळून गेला. उल्हासनें आपल्या दुर्दैवानें संध्येला दुर्दैवी केलें हे स्पष्टच दिसत होतें. परंतु कोणत्या विचित्र दुःखांत ते होरपळून जात होते हें प्रतापला समजेना.

# २

## त्याचें उत्तर--

आजचा तिसरा दिवस होता.

परंतु पावसाची झड यत्किंचितूही कमी होण्याचें चिन्ह दिसेना. दोन दिवसापूर्वी सकाळीं पावसाची सर अशी कोसळूं लागली कीं, तिच्या संथ व तालबद्ध लयीवरून ती सर लवकर परतण्यासाठीं आली नव्हती हें उघडच दिसत होतं. रस्त्यावरून कुणीही फिरकत नव्हते. रस्त्याच्या बाजूचे वृक्ष व विजेचे प्रकाशित दिवे वर्षाधारांचा मार मुकाट्यानें सहन करत उभे होते. बाकी धंतोलीतील सगळे लोक आपआपल्या घराची दारें खिडक्या बंद करून झोंपले होते.

परंतु संध्येला मात्र झोंप आली नाहीं. तिनें या कुशीवरून त्या कुशीवर आपलें तोंड फिरवलें. तिच्या गालांना उशीचा मऊ व शीत असा सुखदायक स्पर्श क्षणभरच झाला. तिनें आपल्या पायांनीं अन् हातांनी शय्येवरचे अस्पर्श कोपरे चांचपून पाहिले. परंतु तिला झोंप येईना.

कारण उल्हासनें नऊ वाजेपर्यंत परत येईन असें नक्की सांगितलें होतें. दहा वाजून गेले तरी त्याची मोटर परतली नव्हती !

संध्येनें अंगावरचें ब्लँकेट पायाशीं फेकून दिलें, खोली प्रकाशीत केली, चूळ भरली आणि विस्कळीत झालेले केस ब्रशानें साफसूफ करून घेतले. मग तिनें छत्री व रेनकोट घेतला. बाहेर झोंपलेल्या गड्याला उठवून तिनें सांगितलें,

'हे बघ. मी आलेंच हं इतक्यांत.'

प्रतापनें आपल्याला रहावयासाठीं म्हणून जी खोली घेतली होती ती संध्येच्या बंगल्यापासून फार दूर अशी नव्हती.

तिला वाटलें प्रताप झोंपला असावा. परंतु त्याच्या खोलीच्या दरवाज्याला जी काचेची दुधिया रंगाची तावदानें होती त्यांतून बाहेर प्रकाशकिरणें झिरपत होतीं.

तिनें तावदानावर हळूंच टिचक्या वाजवल्या. प्रताप उठला. कोणत्या तरी रेशमी वस्त्राची मृदु सळसळ तिला बाहेर ऐकूं आली, त्याच्या पाठोपाठ सपातांचा आवाज व बोल्ट खालीं सरकविले त्याचा आवाजही ऐकूं आला. संध्येला आंत घेत प्रताप म्हणाला,

'आणि उल्हास कुठ आहे वहिनी. आला नाहीं वाटतं अजून?'

'नाहीं. अद्याप आले नाहींत. कदाचित् उद्यां सकाळीं येतील. कुळाकडे गेले आहेत आणि थोडक्यासाठीं त्यांचं मन त्यांना दुखवायचं नसेल. त्यांतून मालगुजाराचं कूळ'

'हं काय. आवाजावरून तुम्हाला सर्दी झालेली दिसते. असं करा तुम्ही. या माझ्या पलंगावर बसा. मी तुमच्या अंगावर गरम रग देतों.'

असें म्हणून प्रतापनें सिगारेट रक्षापात्रांत टाकून दिली. संध्या नको म्हणत असतांना सुद्धां तिच्या अंगावर मऊ रग टाकला आणि तिला तेथून न उठण्याची ताकीद देऊन त्यानें स्टोव्ह पेटवला. स्टोव्हच्या टेबलाशीं काम करताना संध्या प्रतापकडे एकाग्र नजरेनें पाहत होती!

संध्येला वाटलें त्याचें वय सत्तावीसच्या जवळपास असावें. तो उण्यापुऱ्या उंचीचा नी वर्णानें गोरा होता. त्याच्या गोऱ्या रंगावर आरोग्याची सूचक अशी

कोवळी रक्तिमा पसरलेली दिसे. आतां त्यानें रात्रीच्या पोषाखावरून काळ्या रेशमाचा पायघोळ झगा घातला होता. त्याच्या हालचालीबरोबर त्या ओघळणाऱ्या झग्याची मृदु सळसळ होई. तो आवाज संध्येला मोठा हृद्य वाटे.

ओळखीपासूनच्या अवघ्या पंधरवाड्यांत प्रतापचे अनेक विशेष तिच्या मनांत भरले.

तो तिला अतोनात आवडला होता. त्याची सुरम्य मूर्ती तिच्या डोळ्यांसमोर उभी राहतांच तिला आनंद होई. त्याच्या विचारानें तिचें मन व्यथित होत नसे असें मात्र नाहीं. परतु तेव्हांही एकतऱ्हेच्या सूक्ष्म आनंदानें तिच्या हृदयाला गुदगुल्या होत. स्तनपान करतां करतां एखाद्या अवखळ मुलानें बोचकारल्यावरही आईला त्यांत जें सुख भासतें तसें सुख संध्येला त्यांत भासू लागे !

दोन दिवसापूर्वींची गोष्ट तिला आठवली.

......तिनें प्रतापला विचारलें होतें, 'ह मग काय ठरलं ? इथंच करणार ना प्रॅक्टीस ? '

'तूतं तर सनद इथलीच काढली आहे. प्रॅक्टीस चालली तर ठीक. नाहीं तर आमची शेती आहेच.'

'छान झालं. नागपूरांत आतां एका विद्वान् वकिलाची भर पडणार म्हणायची.'

'एका कां ? दोन वकिलांची.'

तेव्हां उल्हासकडं पाहून संध्या म्हणाली होती,

'होय. तुम्ही अन् हे दोन आहांत थोडेंच !'

संध्येनें घाईघाईनें केलेली ही मखलाशी प्रतापच्या ध्यानांत आली आणि तो हळूंच हसला.

मग हा विषयच बदलावा म्हणून संध्या म्हणाली,

'तुमच्यासाठीं मी माडीवरची खोली रिकामी करून घेतें.'

' नको नको. मी आजच जवळ दोन खोल्या राहण्यासाठीं पाहिल्या आहेत. ऑफिस तिकडे सदरमध्यें नी ईतवारींत लावीन.'

संध्येनें मग प्रतापला पुष्कळ आग्रह केला परंतु प्रतापनें आपला निश्चय सोडला नाहीं..........

हें आठवून संध्या क्षणभर अस्वस्थ झाली. तिला प्रताप आपल्याजवळ नेहमीं असावा असें वाटत होतें. तो त्यांच्या बंगल्यापासून फार लांब राहत नव्हता हें खरें असलें तरी त्याच्या निकट सान्निध्याचें अन् मोहक भाषणशैलीचें सुख तिच्यापासून थोडेसें दूर गेलें होतें. आणि आधींच थकून गेलेल्या संध्येला तें सुख मिळवण्यासाठीं चार पाऊलें पुढें जाऊन त्या तिच्या आवडत्या सुखाला हात धरून आणण्याचा कंटाळा आला होता. कारण ती आतां थकून गेली होती.

होय ! संध्या थकली होती, मनस्वी थकली होती......

प्रतापनें स्टोव्ह विझवून तिच्यापुढें चहाचा कप धरला आहे हें ध्यानांत येऊन संध्या हंसली. तिनें कप घेतला व चहाचा घोट घेऊन म्हणाली,

' वा, सुंदर. किती छान चहा बनला आहे.'

' असं ?......थँक्स. '

हंसून पुढें प्रताप म्हणाला,

' पण मला वाटतं ही फाजील स्तुती होत आहे.'

' पण ही स्तुती आहे असं म्हणणं म्हणजे कमाल झाली. वस्तुस्थिती आहे तशी मी सांगितली.'

' बरं, बरं. आणखी हवा असेल तर मी देतों कपांतला.'

प्रतापनें चहा ओतण्याचा अभिनय केला.

तेव्हां पाठीशी टेकायला घेतलेल्या मऊ उशांत अधिक घुसून व चहाच्या पेल्यावर उजव्या हाताचा आडोसा करून ती म्हणाली,

' नको, नको. '

कप स्टोव्हच्या टेबलावर ठेऊन प्रतापनें पाईपमध्यें तंबाखू भरला व सुपारीची डबी संध्येच्या समोर केली.

'घ्या, ना.'

'तुम्ही ?'

'एक्स्क्यूज. मी सुपारी नी पान खात नाहीं. म्हणजे मला ते आवडत नाहीं. एक वेळ शंभर सिगारेट बसल्या बैठकीला ओढीन मी परंतु एक पान खाणं मोठं जिवावर येतं माझ्या.

संध्या हसली.

'वहिनी, कां हंसलांत ?'

'मला हंसायला आलं ते तुमच्या नी ह्यांच्या ह्या आवडीनिवडीबद्दल. ह्यांना सिगारेटचा तिटकारा आहे अन पानाबद्दल आवड आहे तर तुमचं त्या विरुद्ध.........'

'हो. या बाबतींत आमच्या आवडी भिन्न आहेत. खरंच, तुम्ही सांगा वहिनी .... बाहेर पावसाची संथ झिमझिम सुरू आहे. गप्पा मारायला तुम्ही इथं आहांत आणि ह्या सुवासिक तंबाखूचे लोट मी मोठ्या शांतपणानं हवेत सोडत आहे. सुख सुख म्हणतात ते यापेक्षां काय वेगळं असतं ?'

प्रतापनें सुवासिक धुराचा एक लोट सोडला. त्यांतील विरून जाणाऱ्या पातळ वलयाकडे पाहून संध्या विषण्णतेनें हंसली. म्हणून प्रतापनें विचारलें.

'कां बरं ?'

'मी हसलें तें तुमच्या या सुखाबद्दल, जग सुख कशाला म्हणतं कुणास ठाऊक परंतु मला तरी सुख म्हणजे दुःखाचं एक दर्शन आहे असंच वाटतं.'

'तुम्ही असं म्हणावं म्हणजे मोठंच आश्चर्य आहे.'

कां बरं ?'

ज्यानं सुखाच्या प्रवेशद्वाराच्या पायरीवर आपला पाय ठेवला आहे त्यानं मागं वळून दुःखाचे प्रदेश न्याहाळावे म्हणजे आश्चर्यच नाही कां ?'

'नाहीं, नाहीं भाऊजी, गैरसमज होतो आहे तुमचा. मी मघाशीं म्हणालें तेंच खरं. मी सुखांत आहे हें खरं नका मानूं.'

'म्हणजे ! काय म्हणतां'

'होय. खरं तेंच सांगतें. राहवत नाहीं म्हणून सांगतें. उल्हास स्वभावानं चांगले आहेत पण...'

'पण काय ?'

'मोठं विलक्षण आहे तें. उल्हास चांगले आहेत परंतु त्यांना पतीचं इमान माझ्याशीं राखतां येत नाहीं. निसर्गानं त्यांना दुबळं केलं आहे."

विलक्षण विस्मयाची लहर प्रतापच्या शरीरांतून चमकून गेली. त्याचें मस्तक सुन्न झालें, क्षणभर त्याला त्याच्या अस्तित्वाचें भान हरपलें आणि त्याच्या धमनींतून वाहणारे रक्ताचे प्रवाह कोणत्या तरी अज्ञात शक्तींनें अडवून ठेवले, असा दुबळा भास त्याला झाला.

त्यानें संध्येकडे पाहिलें. बिछान्यावर पडलेल्या उशात तोंड लपवून संध्या रडत होती. तिच्या उमाळ्यांनी नी हुंदक्यांनी ती खोली भरून गेली.

बाहेर पावसाची झड किञ्चित् मंदावली. ती अशी मंदावल्यानें सृष्टींत भयाण शांतता नांदू लागली होती. वृक्षांच्या पानांची सळसळ थांबली, सारखे तीन दिवसपर्यंत दाराशी धडक देऊन आणि खिडक्यांतून घुसून लटकणाऱ्या बल्यांना वांकडे तिकडे झोके देणारें वारं दमून जाऊन कुठें तरी निपचित पडलें असावें असें दिसत होतें.

अशा वेळीं त्यांच्यामधील स्तब्धता न आवडून प्रताप म्हणाला,

'वहिनी, टांगा आणवूं ?'

'कांही नको. चालतच जाईन मी.'

'ठीक आहे. पोर्चमधली बत्ती लावतो मी.'

प्रताप मग दार उघडायला गेला. व्हरांड्यांतील खुंटीवर टांगलेला रेनकोट व आपली छत्री घेऊन संध्या गेली...

बंगल्यांत आल्यानंतर तिनें प्रथम गड्याला विचारलें तेव्हा तिला कळलें कीं उल्हास नुकताच आला होता.

तिनें भीतभीत दिवाणखान्यांत प्रवेश केला.

उल्हास सिगारेट ओढीत कोचावर स्वस्थ बसला होता. संध्येला पाहतांच त्यानें सिगारेट टाकून दिली. तो हंसून म्हणाला,

' अगदीं देवासारखी आलीस बघ. '

संध्या स्तब्ध राहिली.

' हो, पण चुकलोंच मी. '

तरीही ती स्तब्धच राहिली.

' देवासारखी नाहीं, देवीसारखी. '

मग दोघेही हंसले.

' काय देशील मला आतां ? '

' चहा. '

' अं हं, चहानं झोंप नाहीं यायची. '

' काय हरकत आहे ? झोंप न आली तर बोलतच बसूं आपण. '

' पण मला झोंप हवी आहे. आज कामाची दगदग फार झाली बघ.'

' बरं...मग काय घेणार ? कॉफी, ओव्हल्टीन.'

' ओव्हल्टीनच. दोघेही घेऊं आपण. '

' बरं '.

' लवकर आण हं. अन् हें बघ......परवाचा वार कोणता ? '

' गुरुवार—कां बरं ' ?

' नाहीं. उगीचच विचारलं. परवा एक महत्वाची केस आहे मला. कोणता म्हणालीस ! गुरुवार नाहीं कां ? '

* * *

होय, गुरुवारच ! तो गुरुवारचा दिवस होता.

त्या दिवशीं सकाळीं आकाशांत मेघखंड नव्हते. सूर्याचे कोंवळे उबदार किरण क्षितीजांतून येऊन त्यांनीं सगळें वातावरण प्रसन्न केलें होतें. पहांटचा वारा मंद मंद वाहात होता.

संध्या दचकून जागी झाली.

तिच्या शय्येच्या बाजूला जी खिडकी होती तिच्यातून तिला नेहमींप्रमाणें बाहेर ओळीनें टांगलेल्या कुंड्या दिसल्या. पितळेच्या पिंजऱ्यांत पोपट पंखांची फडफड करीत होता. सूर्य किरण खिडकीच्या कठड्यापर्यंत आले होते परंतु, खिडकींतून आंत प्रवेश करण्याचा त्यांना धीर होत नव्हता कां, कुणास ठाऊक!

शेजारची उशी संध्येला रिकामी दिसली. नेहमींप्रमाणें संध्येनें उठवल्यानंतर शय्येतून बाहेर येणारा उल्हास आज तिच्या अगोदरच बाहेर पडला होता याचें तिला मोठें नवल वाटलें! म्हणून सकाळीं उठल्याबरोबर उल्हास ज्या खोलींत नियमानें दाढी करी त्या खोलींत ती जवळ जवळ पळतच गेली. खोलीचें दार लोटलें होतें. तें तिनें उघडलें...

उल्हास कोचावर पडला होता. त्याचा डावा हात खालीं लोंबकळत होता. त्याच्या शर्टच्या गुंड्या उघड्या होत्या, ओठ विलग झाले होते आणि अर्धवट उघड्या डोळ्यांतून तो कोणत्या भविष्यकालाकडे टक लावून पाहात आहे हें समजण्यासारखें नव्हतें.

त्याचा अर्थ न समजून संध्येनें गोंधळून सभोंवार पाहिलें.

जवळच एका छोट्या टेबलवर इंजक्शनची पिचकारी व फुटलेली ट्युब पडली होती. तिच्यावरचें नांव तिनें वाचलें,...इनस्युलिन...तेथेंच मोठ्या काळजीपूर्वक एक नोटपेपर घडी करून ठेवला होता. तिनें घडी उकलून वाचावयास सुरुवात केली.—

'प्रथमतः मला हें सांगावेंसें वाटतें कीं या माझ्या कृत्याची सगळी जबाबदारी माझ्यावर आहे...'

तिच्यानें पुढं वाचवलं गेलें नाहीं. सगळ्या गोष्टीचा अर्थ तिला आतां स्पष्ट समजला. त्या क्षणींच ती बेशुद्ध झाली.

त्याच संध्याकाळीं......

प्रताप डॉ. उमाप्रसादांच्या दवाखान्यांत गेला. त्यावेळीं डॉक्टर फोनवर बोलत होते. प्रतापकडे लक्ष जातांच ते म्हणाले,

'ये बैस ना प्रताप.'

मग ते आपल्या असिस्टंट डॉक्टरला म्हणाले,

‘ हे पहा मला यांच्याशीं कांहीं बोलायचं आहे. तेव्हां मला कांहीं वेळ येतां यायचं नाहीं.’

मग डॉक्टरांनीं जाडसा चिरूट शिलगावला.

‘ आज सकाळीं मोठी खेदजनक घटना झाली. परतु त्याचं भाकित मी आधीच केल होत अस म्हटलं तर तुला आश्चर्य वाटेल. नाहीं ?

डॉक्टर क्षणभर थांबले.

‘ सुमारें दोन वर्षांपूर्वीची गोष्ट आहे प्रताप. उल्हासचे वडील ॲडव्होकेट-साहेब मरून दोन तीन महिने झाले होते. मला वाटत तूं नव्हतास त्यावेळीं. उल्हासनें आपल्या एका स्नेह्याबरोबर मोटारीनं जबलपूरची ट्रिप मारायचं ठरवलं.

‘ उल्हास बसला होता, ती गाडी त्याच्या श्रीमंत स्नेह्याची होती. अन् तोच गाडी हाकत होता.

‘ हा मुलगा अट्टल बदमाष होता. त्याला अनेक व्यसनें होतीं. तो माझा कायमचा पेशंट होऊन बसला आहे. प्रवासांत एका ठिकाणीं एका खेड्याच्या सुरुवातीला एका बाईनं घातलेलं दुकान त्यांना लागलं.

‘ ही बाई वयानं चाळीशीच्या जवळ असावी; परंतु याही वयांत तिचा मुख्य धंदा म्हणजे ते चणे मुरमुऱ्याच दुकान नव्हतं, हें त्या मुलाला माहित होतं. त्यानं आपल्या बरोबर उल्हासला तिथं क्षणभर उतरवल.

‘ त्या ठिकाणीं आयुष्यांत पहिल्यांदाच अशा थोराड बाईसमोर, अकल्पितपणें एका अंधाऱ्या खोलींत, अशा रीतीनं आल्यामुळें उल्हाससारखा नव्हेम प्रवृत्तीचा माणूस हिरमुसून गेला.

‘ झालं. आयुष्यांत सुरुवातलाच हा न्यूनगंड निर्माण झाल्यानं पतित्वाचं इमान त्याला पत्नीशीही राखतां आलं नाहीं. त्याला राखतां आलंही असतं परंतु मग पत्नि अशिक्षित आणि वयानं बरीच लहान अशी करायला हवी होती. म्हणजे मग हा न्यूनगंड आपोआप निघून गेलाही असता. मीं त्याला हें सुचवलं होतं. परंतु ही कल्पना त्याला पसंत पडेना.

‘ त्याचा स्वभाव अलिकडं फार संशयी होऊं लागला होता. माझा खात्रीचा अंदाज आहे कीं त्याच्या या नाजुक मर्मस्थानावर कुठूनतरी प्रहार झाला असावा. त्याशिवाय.........’

टेलिफोनची घंटा खणखणून वाजूं लागली तेव्हां डॉक्टर म्हणाले,

‘ कुठलं तरी बोलावणं दिसतं. सवडीनं माझ्या बंगल्यावर यना. ’

‘ ठीक आहे. गुडनाईट ’

‘ गुडनाईट ’

मग प्रताप तेथून निघून गेला.

डॉक्टर उमाप्रसादांच्या सांगण्याचा प्रत्यय एक दोन दिवसांतच आला.

प्रताप आपल्या खोलींत एकटा आहे असें पाहून त्याचा नायडू घर-मालक तेथें आला. हवापाण्याच्या औपचारीक गप्पा झाल्यानंतर त्यानें उल्हासच्या अकल्पित मृत्यूबद्दल खेद प्रदर्शित केला. तो म्हणाला,

‘ खरंच वकीलसाहेब असा स्नेही दुनियेंत मिळायचा नाहीं. मला फार आवडायचा तो. रात्र नाहीं बेरात्र नाहीं केव्हांही लहर आली कीं, स्वारी तुमच्याकडे हजर. परवा रात्रीची गोष्ट मला माहीत आहे ना! रात्रीच्या गाडीनं माझा सुब्बाराव म्हणून स्नेही वर्धेहून येणार होता त्याची वाट पाहत बसलो होतों. दारासमोर गाडी थांबल्याचा आवाज आला म्हणून मी गॅलरींत येऊन पाहिलं. मला वाटलं आमचीच गाडी असेल. पाहतों तर.........

‘ काय ’ अधीर होऊन प्रतापनें विचारलें.

‘ पाहता तर आपले उल्हास...’

‘ कव्हांची गोष्ट आहे म्हणतां ’?

‘ परवाची. मंगळवारची ’

मंगळवार, म्हणजे संध्या त्याच्या खोलींत येऊन रडली तीच रात्र...

‘ मगळवारी. अन केव्हांशीं ? ’

‘ रात्रा नऊ सव्वानऊचा सुमार असावा ’

नऊ सव्वा नऊ! अन् मंगळवार रात्रीं!

म्हणजे हायरे दैवा! संध्येनें आपल्या दुर्दैवाचा पाढा ज्यावेळीं त्याच्या जवळ वाचला तीच ती रात्र होती.

उल्हासनें त्यांचें भाषण आडून ऐकलें होतें हें आतां स्पष्टच दिसत होतें.

# ३

## कॅप्टन मंत्री--

आयुष्याला काय म्हणावें हें प्रतापला समजत नव्हतें. परंतु एवढें मात्र खरें कीं त्यांत येणारे लहान मोठे दुःखाचे प्रसंग शांतपणानें सहन करतां यावेत अशी त्याच्या मनाची घडण होती. परंतु कांहीं कांहीं प्रसंगच असे उत्कट असतात कीं त्यावेळीं मनाचा तोल राखतां न आल्यानें त्यांची खंत फारच वाटूं लागते.

आतां प्रतापची मनःस्थिती अशीच केविलवाणी झाली होती.

त्यानें उल्हासच्या मैत्रींत जें सुख अनुभवलें होतें ते त्याला पारखें झालें. आयुष्यांत त्याच्या वाट्याला आलेल्या अपूर्व सुखाची दुर्दैवानें लूटमार केली. घराच्या उंबरठ्यावरून बाहेरच्या जगांत पहिलें पाऊल घालतां क्षणींच त्याखालीं वादळ निर्माण झालें. प्रतापला त्याचें मनस्वी दुःख झालें.

उल्हासच्या मृत्यूनंतर सुमारें सात आठ दिवसांनीं—

एकें दिवशीं संध्या त्याचेकडे सायंकाळीं आली. तेव्हां प्रताप आरामखुर्चीत स्वस्थ पडला होता ती येतांच त्यानें खोली उजळून तिचें स्वागत केलें, ' या वहिनी. '

'तुम्ही टेनिस खेळायला नाहीं गेलांत ?'

'नाहीं उगाचच.'

तेव्हां न जाण्याचें खरें कारण प्रतापनें सांगितलें नाहीं हे संध्येच्या लक्षांत आलें.

'कुठं गेला होतां आतां तुम्ही ?'

'कुठं ? सरळ तुमच्याकडेंच आलें मी.'

'सिनेमाला येतां ?'

'होय चला कीं. सहा झालेत. फार वेळ नाहीं पिक्चर सुरू व्हायला. मी येतें, पण एका अटीवर !'

'कोणत्या ?'

'पिक्चर आटोपल्यावर जेवावयाला तुम्ही माझ्याकडे यायला हवं. जातांना बाईला सांगून देतें मी.'

'पण...'

'मग मीही पण

'बरं, बरं कबूल.'

संध्या आनंदित झाली.

नंतर ते दोघेही रिजंट थिएटरमध्यें गेले.

चित्रपट इंग्लीश होता, पण तो फारसा चांगला नव्हता. नेहमींप्रमाणें कॉलेजच्या विद्यार्थ्यांनी थिएटरमध्यें गर्दी केली होती. त्यापैकीं फार थोडे सावकाश सिगारेट पीत पडद्यावर पाहत होते. पुष्कळसे विद्यार्थी मात्र पडद्यावर बदलणाऱ्या देखाव्याबरोबर आपआपसांत थट्टाविनोद करीत. पुष्कळदां ते, आपल्या थट्टा विनोदांत आपापल्या कॉलेजांतील मुलींचा उल्लेख करीत हें प्रतापच्या व संध्येच्या ध्यानांत आल्याशिवाय राहिलें नाहीं.

खेळ संपल्यानंतर प्रताप संध्येकडे जेवायला गेला.

जेवण झाल्यानंतर खिशांत चाचपून प्रताप म्हणाला,

'सिगारेट संपल्या माझ्या. जराय येतों मी.'

'कां ? बसा ना. सिगारेटसाठींच घरीं जाणार असाल तर आमच्या इथंही त्या मिळूं शकतील.'

' असं कां. ठीक आहे. मग मी थांबू शकतो. '

प्रतापनें सिगारेट शिलगावली. त्याचें धुम्रपान चालू असतां संध्येनें अस्वस्थपणानें हालचाल केली. मग आपल्या लहानशा हातरुमालानें तिनें गळयावर नी ओठावर टिपलें. घसा मोकळा करून ती प्रतापला म्हणाली,

' गेले एक दोन दिवस हवा फार सुंदर आहे, नाहीं ? '

' अं... हं, हं. '

' पण अलिकडं मजा मुळींच करमेनासं झालं आहे. '

प्रतापनें संध्येकडे पाहिलें. ती त्याच्याकडे टक लावून पाहत होती. खोल खुर्चीत बसूनही टेंकून न बसल्यामुळें तिच्या शरीराला मोहक बांक आला होता. तिच्या गळ्यतील सोन्याचे दोन सर लोंबत होते. त्यांतून तिच्या वक्षःस्थलाचें स्पंदन घाईघाईनें होतांना दिसत होतें.

प्रतापनें आपल्याकडे नजर रोखली हें पाहून संध्येनें दृष्टी खालीं वळवली. ती म्हणाली,

' भाऊजी, माझी एक विनंती आहे. '

' काय ? '

' मी कसं बोलावं मला सुचत नाहीं. पण प्रताप . हें जगणं मला नकोसं झालं आहे. या एकटेपणाची मला भीति वाटून राहिली आहे. प्रताप, प्रताप '

संध्येनें हुंदका दिला.

तिला शांत होऊं देऊन प्रताप म्हणाला,

' वहिनी, ह्या प्रसंगाची मी तयारी केली होती. या बाबतीतील माझ्या भावनांचा मी अभ्यासही केला. उल्हासशी असलेली माझी मैत्री फार इमानी आहे. माझा नाईलाज आहे वहिनी...उल्हासची अमूल्य ठेव माझी म्हणण्याचा धीर होत नाहीं मला...मी जातो, कशाही प्रसंगीं माझी गरज पडली तरी मला कळवा...'

प्रताप तेथून लगेच निघून गेला. त्यानें मग मागें परतून पाहिलें सुद्धां नाहीं.

दुसरें दिवशीं सकाळीं संध्येला न कळवतांच तो आपल्या गांवीं निघून आला.

त्याचं कारण त्याला तिचा तिरस्कार वाटूं लागला हं मात्र नव्हें! तिरस्कार तर नव्हेंच परंतु संध्येबद्दल त्याला अनुकंपा वाटूं लागली होती. तिच्या दुर्दैवाबद्दल त्याला विलक्षण सहानुभूती वाटत होती.

प्रताप आपल्या गांवीं आल्यानंतर त्याला त्याच्या काकांनीं बाजूला नेलें आणि विचारलें,

' मध्येंच कसा आलास तूं?'

' उगाचच. नागपूरपासून कुठंतरी दूर जावं असं वाटलं म्हणून आलों.'

' आलास हें ठिकच झालं. नाहीतरी मी तुला बोलावून घेणार होतों. दादा कालपासून आजारी आहेत ताप येऊन राहिला आहे.'

' काय ! मग मला तावडतोब कळवायचा हवं होतं भाऊसाहेब' विस्मयानं प्रताप म्हणाला.

' मी आज नाहींतरी कळवणारच होतों तूं आलास हें ठीकच झालं. पण मी वेड्यासारखा काय बोलत बसलों. प्रवासाचे कपडे बदल. चहा घे मग दादाकडं जाऊं या.'

माणिकरावांच्या तापाबद्दल काळजी करण्यासारखें कांहींच नव्हतें. साधा हिंवताप होता तो फिरतीवर असणाऱ्या सरकारी डॉक्टरला थांबवून घेण्यांत आले होते.

लवकरच ताप जवळ जवळ निघून गेला. आतां अशक्तपणाच काय तो शिल्लक राहिला एके दिवशीं सकाळीं डॉक्टर, भाऊसाहेब व प्रताप चहा घेत असतां डॉक्टर म्हणाले,

' मग मला आता परवानगी द्या.'

तेव्हां भाऊसाहेब घाईनें म्हणाले, ' छे, छे. डॉक्टरसाहेब. इतक्यांत तुम्ही इथून जाऊं नका. दादा पुरते बरें झाल्यानंतर मग जाल तर कृपा होईल.'

' ठीक आहे. तुमच्या इच्छेप्रमाणं मी राहीन. मग तर झालं. शिवाय मी इथं राह्यला दुसरंही एक कारण आहे. अहो प्रतापसारख्यांची कंपनी असतांना ती सोडून जाणारा वेडा म्हटला पाहिजे.'

डॉक्टर हंसले. भाऊसाहेबांनीही आपल्या हंसण्याची साथ दिली.

तालुक्याच्या ठिकाणीं राहणारे माणिकरावांचे एक मुखत्यार तितक्यांत तेथें आले. प्रतापच्या नांवाचें एक पत्र त्यांनीं आणलें होतें. ते आधल्या दिवसाच्या डाकेनें आलें होतें.

तें पत्र वाचून प्रताप किंचित् हंसला म्हणून डॉक्टरांनी विचारलें,

'कां हंसलांत ? '

'आतांच हें पत्र आलं. मला गेलं पाहिजे नागपूरला. माझ्या स्नेह्याची पत्नि आजारी आहे. तुमची कंपनी सोडून मी जातों आहे म्हणून आतां पाहिजे तर तुम्ही मला वेडा म्हणूं शकता.'

त्यांवर प्रताप हंसला.

'डॉक्टरांनी गंभीर होऊन प्रतापला विचारलें,

'कां, कांहीं विशेष ! '

'नो, नथिंग सिरीयस. '

पुन्हा एकवार प्रतापनें चहा मागवला. मग त्यांत संध्येच्या पत्राचा विषय पार बुडून गेला.

* * *

प्रताप त्याच दिवशीं एक्सप्रेसनें नागपूरला गेला. तो नागपूरला पोंचला त्यावेळीं चार वाजले होते. ऐन दुपार टळून गेल्यामुळें उन्हांतील धग नाहीशी झाली होती. त्यामुळेंच कीं काय, मोटारींची रहदारी वाढल्यासारखी दिसत होती.

प्रतापनें खोलींत प्रवेश केला तेव्हां संध्या आपल्या शय्येवर झोंपली होती.

तिचें मुख मलूल झालें होतें. केस अस्ताव्यस्त होऊन उशीच्या पांढऱ्या स्वच्छ अभ्र्यावर विस्कळले होते. छातीपर्यंत ओढून घेतलेल्या ब्लँकेटवर तिनें आपला हात ठेवला होता. त्यामुळें सोन्याचीं कांकणें तिच्या क्षीण मनगटावरून कांहींशीं खालीं ओघळलीं होतीं. पलंगावरच तिच्याजवळ बसून प्रतापनें संध्येच्या मस्तकावर आपला हात ठेवला व हलूंच हांक मारली,

'वहिनी...'

संध्या दचकून जागी झाली. तिनें प्रतापचा हात आपल्या मस्तकावर दाबून घेतला आणि म्हणाली,

'आलांत तुम्ही भाऊजी. मला वाटलं.. ...'

‘ काय ? ’

‘ तुम्ही नागपूर सोडलंत अन् तेंही माझ्यामुळें.’

‘छे, छे वहिनी. काय ही शंका ! तुम्हाला मी सोडून जाणं कसं शक्य आहे ! मी तुम्हाला विचारून गेलों नाहीं, क्षमा करा मला. असं पुन्हा व्हायचं नाहीं’.

प्रतापचे डोळे अश्रूंनीं ओले झाले.

त्यानें संध्येच्या दुखण्याकडे विशेष लक्ष पुरवलें. त्यानें तिला प्रथम डॉ. उमाप्रसादांना दाखवलें. त्यांच्या सल्लयावरून मग तिला तेथील एका विख्यात लेडी डॉक्टरकडे नेण्यांत आलें.

तिचें नांव मिस् पार्कर !

तिनें संध्येला तपासून सांगितलं,

‘ या केसबाबत डॉ. उमाप्रसाद मला मुद्दाम भेटले होते. त्यांना मी तर सांगेनच परंतु तुम्हाला या बाबतींत मी विस्तारानें सांगतें.

‘ ही केस गर्भाशयाची आहे. विटाळाच्या अनियमितपणानं त्यांच्या गर्भा-शयांत व्याधी निर्माण झाली आहे. हा रोग जुनाट झाला असून यावर शस्त्रक्रिया करणं अवश्य झालं आहे. तरी या बाबतींत तुम्ही माझ्यावर अवलंबून राहूं नका. एक्स्क्यूज माय फ्रँकनेस. ’

‘ मग ? ’ घाबरून प्रतापनें विचारलें.

‘ त्यालाही उपाय आहेच. मी पत्र देतें. तुम्ही मुंबईला जा. अन् उशीर करूं नका. आज किंवा फार फार तर उद्यां निघाच. ’

मग मिस् पार्करनें छोटेंसें पत्र चटदिशी टाइप करून दिलें तिनं दिलेलें पत्राचें पाकिट घेऊन त्यावरील पत्ता प्रतापनं वाचला.

**कॅप्टन दिलीपकुमार मंत्री, एम्. डी**
**मुंबई.**

प्रतापला मोठा खेद झाला. त्यानें कायद्याची व एम्. ए. ची परीक्षा एकदम देऊन या जगांत उमेदीनें जगायला सुरुवात केली. त्याला अवघे चार पांच महिने होत नाहींत तोंच एखाद्या टोळधाडीनें अकस्मात येऊन उभें पीक लुटून खावें त्याप्रमाणें त्याच्या आशाआकांक्षा निष्पर्ण झाल्या. ज्याच्या आधारावर उभे राहून दूरदूरचे प्रदेश त्याला न्याहाळायचे होते ते स्टूलच मुळीं पायाखालून

निसटून गेलें. तूर्त तरी त्याला दिशा अस्पष्ट दिसत होत्या. शक्य तितक्या लवकर संध्येला सुखी करायचें अशी त्याच्या जिवाला ओढ लागली. त्यासाठीं त्याचें स्वतःचें वैयक्तिक जीवन तो पार विसरून गेला.

मिस् पार्करनें सांगितल्याप्रमाणें प्रताप संध्येला घेऊन कॅप्टन मंत्रीकडे रवाना झाला.

एका सकाळीं मुंबई मेलनें तो नि संध्या मुंबईला पोंचले.

संध्येच्या अंगांत अद्यापही ताप होतांच, शिवाय तिला अशक्तपणाही फार वाटत होता.

हॉटेलमध्यें उतरून प्रथम तो टेलिफोनवर गेला.

'हॅलो, हॅलो.'

'हॅलो, कोण हवं आहे तुम्हाला?'

'कॅप्टन साहेब.'

'कॅप्टन साहेब कामांत आहत. कांहीं खाजगी काम नसेल तर बोला कीं.'

'आपण कोण?'

'मी त्यांच्या दवाखान्यांतील सिस्टर, सिस्टर सहेली मी. हॅलो, आपला परिचय?'

'मी नागपूरहून आलों, मिस् पार्करचं पत्र घेऊन. कॅप्टनसाहेब मला इथं हवे आहेत पेशंट आजारी आहे. येतील कां ते?'

'नाहीं. तें शक्य दिसत नाहीं. मागच्या आठवड्यापासून आजच्या दिवसाला बरेच पेशंट बुक झाले आहेत. ते येऊं शकणार नाहींत. बराय.'

'हॅलो, हॅलो...'

मग काय करावें तें प्रतापला समजेना. त्यानें संध्येला हें सांगितलें तेव्हां ती म्हणाली,

'त्यांत काय आहे भाऊजी. जाऊं या आपण दवाखान्यांतच.'

'तें खरं. परंतु ताप उलटला तर.'

'ऊं, त्याचं काय विशेष.'

संध्येला दिसलें, प्रताप तिच्याकडे कांहींसा रोखून पहात होता. आपण आपल्या प्रकृतीबद्दल जी निष्काळजी वृत्ती प्रगट केली त्यानें प्रतापच्या भावना दुखावल्या गेल्या असल्या पाहिजेत हें उघड दिसत होतें. म्हणून ती घाईनें म्हणाली,

'ऊं, त्याचं काय विशेष ? बाहेरच्या वाऱ्याला आंत मोटारींत प्रवेश करूं दिला नाहीं म्हणजे झालं.'

त्यांवर प्रताप हंसला.

त्यानें लवकरच एक टॅक्सी बोलावली. तिच्या सगळ्या कांचा लावून घेतल्या. मागच्या बैठकांच्या जागीं तिच्यासाठीं त्यानें नरम शय्या तयार केली. तिच्या अंगावर ब्लॅंकेट टाकून तो तिच्या जवळच बसला.

ते पोंचले त्यावेळीं आंत कॅप्टन साहेब रोग्याची तपासणी करत होते.

सिस्टर सहेलीला भेटून प्रतापनें मिस् पार्करचें पत्र व आपलें कार्ड कॅप्टन साहेबांकडे तिच्याकरवीं पाठवून दिलें.

मिस् पार्करच्या पत्राचा अनुकूल परिणाम झाला. त्याला फार वेळ वाट पहावी लागली नाहीं. लवकरच सिस्टर सहेली आली ती कॅप्टनसाहेब त्यांना बोलावतात हा निरोप घेऊनच !

# ४

# मुसळधार पावसाच्या रात्रीं....

अर्धद्वार ढकलून प्रतापनें आंत प्रवेश केला त्यावेळीं कॅप्टन मंत्री डायरींत कशाची तरी नोंद घेत होते. प्रतापला आंत आलेला पाहून आपली फिरती खुर्ची किंचित् फिरवून कॅप्टनसाहेब म्हणाले,

'या.'

'गुड मॉर्निंग'

'गुड मॉर्निंग'

'नमस्कार'

'नमस्कार. आपलंच नांव संध्या, नाहीं कां ?

'हो'

'मिस् पार्करचं पत्र मिळालं मला. तिचा वडील भाऊ महायुद्धांत मारला गेला. तो माझा जानी दोस्त होता. त्याची आठवण उत्कटतेनं आली म्हणजे मी हिला लिहीतों एखाद् वेळ. बाकी ही मुंबईला आली म्हणजे मला भेटल्याशिवाय मात्र क्वचित्‌च जाते.'

कॅप्टनसाहेब क्षणभर थांबले.

प्रतापला मात्र हें समजलें नाहीं कीं, ज्याला क्षणाची उसंत नाहीं अशा डॉक्टरनें हें भारुड सांगून उगाचच आपल्या अमूल्य वेळेची खोटी कां करावी !

प्रतापच्या मनांतील विचार कॅप्टनसाहेबांना समजला कीं काय कुणास ठाऊक ! त्यांनीं मनगटावरील घड्याळ पाहिलें व खुर्चीवरून उठून ते म्हणाले,

‘ चला टेबलावर. ’

तपासणीच्या खोलींत कॅप्टनसाहेब नी संध्या आंत गेलेली पाहून प्रताप खोलीबाहेरील खुर्चीवर बसला. परंतु तेथें त्याला तसा बसलेला पाहून कॅप्टन-साहेब त्याला इंग्रजीत म्हणाले,

‘ तुम्हाला आंत यायला कांहींच हरकत नाहीं. मला बोलायचालायला कुणी तरी हवं असतं. ’

कॅप्टनसाहेब हंसले.

कॅप्टनसाहेब असें म्हणाले खरे ! परंतु संध्येची प्रत्यक्ष तपासणी करत असतां ते प्रतापशीं मुळीसुद्धां बोलले नाहींत.

प्रतापच्या ध्यानांत आलें, मघाशीं बोलतांना कॅप्टनसाहेबचे डोळ्यावर चष्मा नव्हता. सोनेरी कडांचा चष्मा त्यांनीं आतां लावला होता. परंतु आतां त्यांची नजर इतकी एकाग्र होऊन गेली होती कीं त्या चाळीशीचा तिला सासूर-वासच वाटावा.

चाळिशी ! कॅप्टनसाहेबांचें वय तर जवळ जवळ साठ असावें. परंतु त्यांच्या फुगीर गालावरून ओघळणाऱ्या पिवळ्या मांसावर एकही वळी नव्हती. त्यांचे डोळे नि हनुवटी मांसाच्या गोळ्यांत बसवल्यासारखी दिसत होती. त्यांच्या डोक्यावर टक्कल होतें. त्यांनीं साफ श्मश्रू केल्यानें या व्यतिरिक्त त्यांच्या वृद्धत्वाची निशाणी कुठेंही उमटलेली दिसत नव्हती !

तपासत असतां वेगवेगळ्या कोनांत नी वेगवेगळ्या डौलांतील त्यांचें आकर्षक व रुबाबदार व्यक्तित्व पाहण्यांत गुंतलेल्या प्रतापला ते म्हणाले,

‘ वेल्, यांना इथं कांहीं दिवस रहावं लागेल. ’

कॅप्टनसाहेबांनीं स्टेथास्कोप तसाच मानेशी अडकवून दिला व उजवा तळहात बाजूच्या भिंतीला टेकवून ते म्हणाले,

‘ सिस्टरकडून खोलीचा नंबर मिळवून घ्या. ऑपरेशन करावं लागेल—’

‘ ऑपरेशन ! ’ प्रताप उद्गारला.

‘ हो, कां ! फारच साधं ऑपरेशन आहे.’

मग कॅप्टन साहेबांनीं नोकराला दुसऱ्या रोग्याला पाठवून देण्याबद्दल सांगितलें.

त्यानतर दोन दिवसांनीं संध्येच्या गर्भाशयावर शस्त्रक्रिया करण्यांत आली. ती यशस्वी झाली असे सुद्धां सांगण्याची गरज नाहीं इतकी ती साधी होती.

संध्या दवाखान्यांत होती व प्रताप हॉटेलांत राहत होता.

ज्या दिवशीं संध्येच्या गर्भाशयावर शस्त्रक्रिया करण्यांत आली त्याच रात्रीं !—

सुमारें दहा वाजण्याचा सुमार असेल. संध्या आपल्या शय्येवर झोंपली होती. तिच्या तोंडावरचें उज्वल तेज लोपून गेलें होतें. ओठ शुष्क दिसत होते. दिव्याची मंद किरणं तिच्या कानांतील कुड्यांवर पडल्यानें तीं चमकत.

प्रतापनें हातांतील पुस्तक मिटलें व संध्येकडे पाहिलं. तिचे निस्तेज डोळे पापण्यांनीं झाकले होते. त्यानें पुन्हां वाचायला सुरुवात केली.

कंकणांचा आवाज ऐकूं आल्यानें प्रतापनें संध्येकडे पाहिलें. तिनें वक्षःस्थलावरून हात काढून खालीं ठेवला होता.

‘ कसं वाटतं वहिनी ? ’

‘ ठीक आहे. ’

‘ पोटांतलं दुखणं बंद झालंना ’

‘ हो, मघाच्या इंजक्शनपासून पोटांत कळ येणं बंद झालं आहे. ’

‘ म्हणूनच झोंपही आली वाटतं तुम्हांला ? ’

‘ झोंप ! छे ! डोळे मिटून घेतले होते मी !

‘ झोंप आली नसतांही ’

‘ हो ’

‘ कां बरं ? ’

संध्या खिन्नपणानें हंसली.

प्रतापला त्या हंसण्याचा अर्थ स्पष्ट समजला. दुखण्याच्या त्या तशा स्थितींतही संध्या कोणता तरी विचार करत आहे हें प्रतापनें ओळखलें.

' माझी एक विनंती आहे. '

' वहिनी, असं काय करतां तुम्ही. तुमच्यात नि माझ्यांत परकेपणा कां आहे ? '

संध्या पुन्हा हंसली.

' पण जें मला बोलायचं आहे याला निव्वळ परकेपणा नसणं एवढंच नातं पुरेसं होत नाहीं. दोन लहान मुलांत कधीं परकेपणा असतो कां ? '

तेव्हां संध्येच्या बोलण्याचा रोख ओळखून तिला बरें वाटावें म्हणून प्रताप आपल्या खुर्चीवरून उठून संध्येच्या शय्येवर बसला व म्हणाला,

' झोंपा पाहूं तुम्ही वहिनी. पाहिजे तर थोपटतों तुम्हाला. '

प्रतापनें खरोखरच तिच्या भव्य कपाळावर झपावलेले केस व्यवस्थित केले. मग हळूंच थोपटायला त्यानें सुरुवात केली.

प्रताप संध्येच्या जवळ बसला. परतु तेवढेंसुद्धां अंतर संध्येला तिच्यांत नि त्याच्यांत नकोसें झालें होतें. प्रतापच्या नि आपल्या शरीरांतलें अंतर तिला विलक्षण त्रासदायक वाटत होतें. त्यानें अंगांत जो निळया ब्लेझरचा कोट घातला होता त्याच्या गुंड्या उघडून त्याच्या वक्षःस्थलांत आपलें तोंड झाकावें असें तिला वाटलें. जणूं काय तिच्या हृदयांतले नाजूक भाव सरळ त्याच्या हृदयाला तिला कळवायचें होतें.

प्रतापनें पाहिलें तेव्हां तिनें डोळे मिटले नव्हते. आपले विशाल डोळे तिनें प्रतापकडे लावले होते. त्या तिच्या मुद्रेंत आभाराचे नी कृतज्ञतेचे भाव होते. त्या केविलवाण्या कटाक्षानें बावरून जाऊन त्यानें तिच्या कानातील कुड्यां-कडे पाहिलें. पूर्वीचें त्यांचें तेज कशांत विरून गेलें होतें कुणास ठाऊक !

मस्तकावरचा प्रतापचा हात काढून संध्येनें तो आपल्या गालावर दाबला व रडूं लागली.

तिच्या डोळयांतून वाहणाऱ्या उष्ण आंसवांचा स्पर्श होतांच प्रताप भांबा-वून गेला. संध्येनें रडावें हें अगदीच सहज आहे हें त्याला समजत होतें.

संध्येचे वडील मुंबईत एक प्रसिद्ध व्यापारी होते. व्यापारांत खूप पैसा मिळवावा नी आपल्या एकुलत्या एका मुलीला शाही इतमामात वाढवावं बस्स ! ह्या दोन गोष्टींपलीकडे त्यांना तिसरी गोष्ट माहित नव्हती.

पण तिसऱ्या गोष्टीची माहिती त्यांना लवकरच झाली. ती म्हणजे क्षय! त्यावेळीं धाकटी संध्या दहा वर्षांची असेल. संध्येच्या आईनें इतक्या खस्ता खाऊनही वर्षाच्या अवधींत 'संध्या संध्या' करत त्यांनीं एका सायंकाळीं प्राण सोडला.

पैसा अडका मिळेल तितका गोळा करून संध्येची आई नागपूरला आपल्या भावाकडे आली. तिनें आपली सगळी संपत्ती भावाजवळ ठेऊन दिली संध्या आपल्या शिक्षणांत दिवसेंदिवस जास्त जास्त लक्ष घालूं लागली. ती पहिल्या वर्गांत मॅट्रिकची परीक्षा पास झाली. पुढच्या शिक्षणाबद्दल तिनें मामांना विचारतांच त्यांनीं कानावर हात ठेवले. हिशेबाच्या वह्या तिच्या तोंडावर फेंकून त्यांनीं सांगितलें,

'तुझा सगळा पैसा संपला.'

परंतु संध्येनें धीर सोडला नाहीं. एका श्रीमंत बनियाच्या पत्नीची शिकवणी तिला मिळाली होती.

इंटरची परीक्षा पास झाल्यानंतर तिचा नी उल्हासचा परिचय झाला. उल्हास श्रीमंत होता हें तिला माहित होतें. हा परिचय तिनें आपल्याकडून फारसा वाढूं दिला नाहीं, परंतु तिनें बी. ए. ची परीक्षा दिली. त्यापूर्वी चारच महिने तिची आई वारली.

ती पोरकी झाली.

मग तिनें आपणहून त्या चार महिन्यांत उल्हासशीं परिचय वाढवला. एक दिवस तिनें आपली लग्न करण्याची इच्छा प्रदर्शित केली.

याचें कारण एकच! ती थकली होती. तिला आश्रय हवा होता. जिथें कांहीं क्षण डोळे मिटून विश्रांति घेतां येईल असा भरंवशाचा स्कंध तिला तिचें डोकें टेकवायला हवा होता.

...पण तिनें योजलें होतें काय अन् झालें काय...

आयुष्यांत ज्याच्या वाट्याला नेहमीं दुःखेंच येतात त्यांचा आपल्या अश्रूं-वर ताबा नसतो. परंतु मोठ्या निग्रहानें आपले अश्रू आवरून धरणाऱ्या संध्येनें आपण जवळ बसतांच रडायला कां लागावें हें प्रतापला समजेना!

वेडा प्रताप—

आपला हात न काढतां किंचित वांकून तो म्हणाला,

' वहिनी, असं काय करतां ? '

' एक सांगाल मला ? '

' खात्रीनं. '

' मला आयुष्यांत तुम्ही एकटी नाहींना सोडणार ? '

' वहिनी छे, छे, अशी शंकाच यायला नको. मी तुम्हाला विसरेन ? छे, तें शक्य नाहीं. '

प्रतापनें संध्येकडे रोखून पाहिलें. आजारांत शरिराबरोबर तिचें मनही दुबळें झालें होतें. त्या तिच्या दुबळ्या मनाला कसें समजवावें हें प्रतापला समजलें नाहीं.

तिनें आपलें मस्तक उशीवरून काढून त्याच्या मांडीच्या आधारावर ठेवलें व आपलं तोंड तळहातानं झांकून, ती रडूं लागली .

प्रतापची मनःस्थिती मोठी केविलवाणी झाली. आपलें वर्तन तिला परके-पणाचं दिसत असलें पाहिजे हें उघडच दिसत होतें. त्याला त्याचा विषाद वाटला. त्याला वाटलें विलक्षण पवित्र, एकनिष्ठ व कोंवळ्या अशा तिच्या भाव-नेचा असा विच्छेद करण्याचा हा कोणता न्याय ?

म्हणून त्यानं तिच्या कपाळाला ओठानें स्पर्श केला. मग तिच्या त्या वक्र नी रेखीव भुंवयांचें चुंबन घेतलें.

संध्या कहींशी शांत होऊन पडली आहे असें पाहून प्रताप तिचा निरोप घेऊन बसच्या नाक्यावर बसची वाट पाहत उभा राहिला.

त्याच्या डोक्यांत विचारांचें वादळ सुरू झालें होतें.

त्याच विचारांत असतां बस आली. बसमध्यें बसतां बसतां त्यानें आका-शाकडे पाहिलें. आकाशांत ढगांची तुफान गर्दी उसळली होती. विजेचे चमकारे लागोपाठ होत होते. आणि बसमध्यें बसलेले उतारू त्या विचित्र हवेबद्दल बोलत होते.

आपल्या खोलींत येतांच प्रतापनें दारें व खिडक्या बंद केल्या. मग त्यानें कपाटांतून सिगारेटचा डबा काढून फोडला.

जो एक प्रश्न त्याला सारखा छळत होता त्या प्रश्नाचें उत्तर शोधण्याच्या तयारीनें तो बसला. त्या प्रश्नाचें त्याला उत्तर हवें होतें, त्या विचाराचा त्याला शेवट करायचा होता.

संध्येचं काय करायचं?

प्रतापनें सिगारेट शिलगावली, बत्ती मालवली आणि पाठीशी टेकायला उशा घेऊन हळूं हळूं धुम्रवलयें सोडत त्यानें विचार करायला सुरुवात केली.

खरंच! संध्येचं काय करायचं!

त्यानें हलुवारपणें आपलें हृदय तपासलें. परंतु त्यांतील कोणताही कोपरा संध्येनें अडवला नव्हता. आपल्या जिवलग स्नेह्याची पत्नि म्हणून प्रथम त्याला तिच्याविषयीं कमालीचा आपलेपणा वाटत होता. आणि आतां दुर्दैवाच्या धारे-खालीं आलेल्या त्या अभागी जीवाबद्दल तर अधिकाधिक अनुकंपेशिवाय दुसरा कोणताच विचार त्याच्या मनांत येत नव्हता.

म्हणून प्रतापनें ठरवलें......

......आणि जें ठरवलं त्यानें त्याला फार समाधान झालं.

तो उठला. सिगारेट रक्षापात्रांत टाकून प्रकाश केला.

दिव्याच्या सौम्य निळसर प्रकाशांत प्रतापची सगळी हालचाल मोठी मोकळी नी उत्साहपूर्ण दिसत होती. त्याच्या मनांतलें वादळ निघून गेलें होतें.

प्रतापनें खिडकी उघडली. विजेच्या दिव्यानें प्रज्वलित झालेल्या रस्त्यावर जलधारा सावकाश येऊन कोसळत होत्या. वारा वेगानें वाहत होता. विजेचे तेजस्वी नागमोडी चमकारें होत व तेवढ्या प्रकाशांत काळोखांत न दिसणारें काळेंभोर क्षितीज उजळें. वातावरण अधिकाधिक वादळी होत चाललें होतें.

प्रताप दुसरें दिवशीं सकाळीं झोंपून उठला त्यावेळीं दिवस समजण्यासारखा नव्हता. कारण पाऊस थांबला तर नव्हताच, उलट त्याचा वेग अधिक वाढला होता.

प्रतापनें घाईघाईनें दाढी घेतली आणि तो संध्येकडे गेला. त्यावेळीं नऊ वाजले होते.

आज संध्या नेहमीसारखी बोलत, हंसत नव्हती. तिचे डोळे सुस्तावले होते आणि त्यांच्याखालीं अशक्तपणा दर्शवणारीं वर्तुळें अधिक काळीं दिसूं लागलीं

होती. उशाशीं प्रताप उभा आहे हें तिला समजतांच तिनें त्याच्याकडे डोळे वळवले व ती हंसली.

'कसं वाटतं आतां तुम्हाला?'

'बरं आहे कीं.'

संध्येचा हात हातांत घेऊन प्रताप उद्गारला, 'म्हणजे!'

'काय?'

'टेंपरेचर दिसतं आहे.'

मग प्रतापनें थर्मामिटर लावलें......आणि खरंच! संध्येला ताप चढला होता.

'फार नाहीं.' संध्या म्हणाली.

'म्हणून काय झालं. मी आतां डॉक्टरांना बोलावून घेतों.'

मग प्रतापनें संध्येची शुश्रुषा करणाऱ्या नर्सला असिस्टंट डॉक्टरांना बोलावण्यास सांगितलें त्याप्रमाणें असिस्टंट डॉक्टर ब्रॅगंझा आला.

संध्येला तपासून तो म्हणाला,

'काळजीचं कारण नाहीं. हवा बदलली त्याचा परिणाम आहे हा. मिक्श्चर बदलून देतों'.

'कॅप्टन साहेबांना बोलावण्याची कांहीं जरूरी आहे कां?'

'छे, छे—' डॉ. ब्रॅगंझा घाईनें म्हणाला.

'—जरूरी नाहीं, शिवाय कॅप्टनसाहेब आज येणारही नाहीत. होय ना ग?'

डॉ. ब्रॅगंझानें नर्सकडे पाहिलें. दोघेही हंसले. मात्र त्याचें कारण प्रतापच्या ध्यानांत आलें नाहीं. आपले हंसणें प्रतापला वाईट दिसूं नये म्हणून ब्रॅगंझा म्हणाला,

'कॅप्टनसाहेब आज यायचे नाहींत कारण आज रविवार आहे. रविवारीं ते सहसा दवाखान्यांत येत नाहींत.'

डॉ. ब्रॅगंझाची ही सारवासारव प्रतापनें ओळखली. हा विचार मनावेगळा करण्यासाठीं म्हणून त्यानें आपल्या जवळची सिगारेट ब्रॅगंझाला दिली, व स्वतः धुम्रपान करूं लागला.

डॉ. ब्रँगंझानें औषध बदलून ते दोन दोन तासांनीं द्यावयास सांगितलें होतें. त्याप्रमाणें प्रतापनें औषध दिलें. इतकेंच नव्हे तर संध्येनें त्याला जेवायला जायचा परोपरीनें आग्रह केला होता तरी तो तेथून हलला नाहीं. दवाखान्यांतील एका नोकराकडून कांहीं सँडविचेस्, ब्रेड व चहा त्यानें बोलावून घेतला.

याचें कारण एवढेंच होतें कीं संध्येची प्रकृती प्रतापला काळजी करण्या-सारखी वाटत होती

......आणि आतां तर रात्रींचे नऊ वाजले होते तरी संध्येचा ताप कमी होईना. प्रतापनें संध्येच्या डोळ्याकडे बारकाईनें पाहिलें. सकाळच्या मानानें तापाची अधिक ग्लानी तेथें तरंगत होती. म्हणून त्यानें थर्मामिटर लावलें व तापाचें मान घेऊन तें ताडून पाहिलें.

सकाळपासून ताप सारखा वाढत होता. मग प्रताप बेचैन झाला. त्याला काय करावें हें सुचेना. सकाळपेक्षां संध्या जास्त तगमग करूं लागली होती.

म्हणून प्रतापनें नर्सला विचारलें, 'हें पहा. कृपाकरून डॉ. ब्रँगंझाला जरा पाठवून द्याल काय?'

नर्सनें आपली दृष्टी खालीं वळवली. तेव्हा प्रतापनें पुन्हा एकवार तीच विनंती केली. तेव्हां नर्स म्हणाली,

'तें शक्य दिसत नाहीं. ते दुपारीच कल्याणला गेलेत.'

'मग कॅप्टनसाहेब तरी?'

'तेही तुम्हाला भेटणं शक्य नाहीं.'

'निदान सिस्टर सहेली?'

'त्या आज कामावर नाहींत.'

'मग त्यावेळीं इथं जबाबदार कुणाला समजायचं?'.

प्रताप चिडून बोलला. त्याच्या त्या रागावून उच्चारलेल्या शब्दांना भिऊन नर्स तेथून गेली.

परंतु ती वेळ नुसती चौकशी करण्याची नव्हती. म्हणून त्यानें कॅप्टन-साहेबांच्या बंगल्याचा नंबर घेऊन फोन केला.

'हॅलो......हॅलो......एक पेशंट घेऊन आलों आहे......काय भेटत नाहीं म्हणतां......झोंपले असतील मग?......कोणत्याही परिस्थितींत त्यांनीं इथं यायलाच पाहिजे......छे, छे ते येतीलच......अं, हं, त्यांना घेऊन यायला मी येतोच......

प्रतापनें आपला निश्चय पक्का केला. काय वाटेल तें होवो! कॅप्टन साहेबांना घेऊन यायचंच.

मग त्यानें नर्सला संध्येजवळ बसायला सांगितलें. घाईघाईनें खालीं आला व एका टॅक्सीला बोलावून म्हणाला,

'हं, चल, जरा वेगानं जाऊं दे. मलबार हिल्......'.

टॅक्सी वेगानं निघाली.

पाऊस रद् रद् कोसळत होता.

५

# न विसरतां येणारा प्रसंग--

पोचमध्यें येऊन मोटार थांबताच प्रताप खालीं उतरला. व्हराड्यांत कुणीही नव्हतं. म्हणून प्रतापनें बटन दाबलें. त्यानें एक मिनीट वाट पाहिली व मिनिटामिनिटाच्या अंतरानें पांचदा बटन दाबलें. परंतु कुणीही येण्याचें चिन्ह दिसेना. म्हणून आंतील चाहुलीकडे लक्ष देऊन प्रतापनें विजेची घंटा सारखी खणखणूं द्यायचा निश्चय केला.

मग चिडूनच त्यानें बटन दाबलें.

ही प्रतापची युक्ती फळाला आली. कुणी तरी पायऱ्या उतरून येत आहे अशी त्याला अस्पष्ट चाहूल आली.

दाराची अडसर काढली गेली. आणि काळोखांतून चिडक्या आवाजांत कुणीतरी विचारलें,

‘ कोण पाहिजे हो तुम्हांला ? ’

मग खोलींत प्रकाश झाला. मात्र प्रतापला हें समजेना कीं जो मंद प्रकाश आतां त्या खोलींत दिसतो तो त्या लटकत्या दुधिया रंगाच्या बत्तींतून पाझरला

किंवा ज्या मुलीनें दार उघडलें होतें त्या मुलीच्या दिव्य सौंदर्याचा तो साक्षात्कार आहे......

परंतु इतकें निरखून पाहण्याइतकी प्रतापची मनःस्थिती नसल्यानें तिनें विचारलेल्या प्रश्नाचं उत्तर त्यानें प्रश्नानेंच दिलें,

'कॅप्टन साहेब आहेत कां?'

'हो आहेत,......कां?

'मला त्यांना भेटायचं आहे.'

'तें शक्य नाहीं. झोंपले आहेत ते.'

'कृपा करून तुम्ही त्यांना उठवा. तिकडे दवाखान्यांत माझी वैनी आहे. तिची स्थिती चिंताजनक होऊन राहिली आहे. कृपा करून उठवा त्यांना. शिवाय तिथं असिस्टंट नाहीं. सिस्टरचा पत्ता नाहीं—उठवा तुम्ही—मी क्षमा मागेन त्यांची.'

इतक्या आर्जवानें प्रताप आतांपर्यंत कुणाशीच बोलला नव्हता. तो त्या तरुण मुलीकडे पाहून बोलत नव्हता. कारण तिच्या तोंडाकडे त्याची नजर खिळलेली पाहून तें तिला वाईट दिसलें असतें. म्हणून प्रतापनें आपले डोळे तिच्या नाजुक कंठावर केंद्रीत केले.

त्याच्या बोलण्यांतील लाचारी त्या मुलीच्या ध्यानांत आली. ती म्हणाली,

'हें पहा मिस्टर, तुमची अडचण मला समजली. मघाशीं फोनवर बहुतेक तुम्हीच बोलत होतात. नाहीं?'

'हो, हो.'

'पण माझा सुद्धां त्याला कांहींच इलाज नाहीं. कॅप्टनसाहेब तिकडं झोंपले आहेत आणि माझी त्यांना उठवायची हिंमत नाहीं.'

असं म्हणून त्या मुलीनें बाजूच्या खोलीकडे अंगुलीनिर्देश केला.

'तुमची हिंमत नसेल तर मी उठवतों. परंतु त्यांना उठवणं अगदीं जरूर आहे.'

'नाहीं, तें शक्य नाहीं.'

मग ती मुलगी दार बंद करण्याच्या इरादानें कांहींशी मागें सरकली व दाराची एक फळी तिनें सावकाश ढकलली.

प्रतापला तें विलक्षण अपमानास्पद वाटलें. त्याच्या भुंवया वक्र झाल्या, कानशिलें लाल झालीं व त्याचा देह थरथर कापूं लागला.

ह्याचें कारण अगदीं स्पष्ट होतें. एकतर त्यानें संध्येबद्दल जो निश्चय कायम केला होता त्या निश्चयाची राळ करणारा हा प्रसंग होता. त्यानें विचारपूर्वक ठरवलें होतें, काय वाटेल तें होवो संध्येपासून कांहीं ठराविक अंतर राखायचं. तिच्या हृदयांत आपल्याबद्दल रुजलेल्या प्रीतीचं बीज पल्लवीत होऊं द्यायचं नाही.

परंतु एक केल्याशिवाय राह्यचं नाही. नव्हे, तेवढं एकच आपल्या जीवितांतील मंगल कर्तव्य समजायचं. संध्येला आपल्या मनगटाचा आधार द्यावयाचा, बाहेरचे रानटी हल्ले व संध्या ह्यांच्यामध्यें आपल्या छातीचा तट ठेवायचा...

म्हणून आतां प्रतापला वाटलें, कॅप्टन मंत्रींनें आतांच्या आतां दवाखान्यांत आलेंच पाहिजे. त्या मुलीच्या वर्तनानें प्रतापला स्पष्ट दिसले कीं कॅप्टनसाहेब सकाळपावेतों येणें शक्य नाहीं. त्याची त्याला विलक्षण चीड आली. तशांत तो आज दिवसभऱ्यांत जेवलाही नव्हता.

प्रतापनें त्या मुलीचा रोख ओळखला व आंत झटकन प्रवेश करून तो म्हणाला,

'हें पहा, कॅप्टनसाहेब यायलाच पाहिजेत; त्यांनीं आतांपर्यंत इतरांना हुलकावण्या दिल्या असतील परंतु मी तें ऐकून घ्यायचा नाही. कॅप्टनसाहेब आलेच पाहिजेत. कॅप्टनसाहेब येत नाहींत म्हणे. ही काय गंमतीची गोष्ट आहे. काम घेण्यांत मुलाहिजा कसचा ? दाम मोजले आहेत छन छन्—'

प्रतापनें त्याचा अभिनय केला.

त्या मुलीच्या हें ध्यानांत आलें कीं, गृहस्थ फार चिडून बोलतो आहे. तो काय करतो हें मुकाट्यानें पाहण्याशिवाय दुसरा ईलाज नव्हता तिला.

त्या मुलीनें ज्या दिशेनें अंगुलीनिर्देश केला होता तिकडचा दरवाजा उघडून प्रतापनें आंत प्रवेश केला.

केवढा प्रशस्त दिवाणखाना होता तो ! दिवाणखान्याच्या एका भिंतीशीं मंद दिवा तेवत होता. एकावेळीं चाळीस पन्नास इसम बसतील एवढा मोठा

दिवाणखाना होता तो. जमिनीवर मोठमोठे इराणी गालिचे कोन साधून पसरले होते. दिवाणखान्याच्या मधोमध मोठें थोरलें व्याघ्रांबर व्याघ्रमुखासह होतें. त्या निश्चल व्याघ्राचे काचेचे थिजके डोळे मंद उजेडांत भेसूर दिसत.

दिवाणखाना मागें टाकून प्रतापनें त्याला जोडून असलेल्या खोलीचें दार उघडलें. त्याची निश्चित कल्पना होती कीं कॅप्टन साहेबांचे शय्यागृह ते हेंच असावें.

प्रतापचा अंदाज खरा ठरला.

त्यानें हळूंच दरवाजा उघडला, व आंत प्रवेश केला. किती विलक्षण दृश्य होतें तें !

प्रतापचा विश्वास आपल्या डोळयांवर बसेना.

कॅप्टनसाहेबांचें तें शय्यागृह फारसें मोठें नव्हतें. एक मोठा पलंग व टेबल ठेवल्यानंतर त्या खोलींत फारशी जागा उरली नव्हती एवढेंच तें मोठें होतें. खोलीला एक मोठी थोरली फ्रेंच पद्धतिची रुंद खिडकी होती. बाहेर पावसाची झड सुरू होती. त्यांतील उतावळया जलधारा त्या खिडकीबाहेर दिसत होत्या. भिंतीवर फक्त दोनच मोठीं तैलचित्रें होतीं. त्या दोनही तैलचित्रांत रंगवलेल्या पोरसवदा मुलींनां आपल्या अंगावरचें अपुरें वस्त्र आवरून कां धरूं नये हें समजण्यासारखें नव्हतें.

कोपऱ्यांतील शिसवीच्या टेबलवर ब्रॉंझचा एक अर्धनग्न पुतळा होता. त्या पुतळ्याच्या आजूबाजूला मद्याच्या दोन तीन बाटल्या व कांचपात्रें होतीं. त्यापैकीं एक कांचपात्र लवंडून टेबलवर पडल्यानें त्यांतील मद्य टेबलवर ओघळून सांडले होतें. टेबलवर गुलाबी रंगाचा मंदसा दिवा तेवत होता. खिडकींत कांचेची फुलदाणी होती.

प्रतापनें पुन्हा पुन्हा पलंगाकडे वळून पाहिलें......

कॅप्टनसाहेब झोपले होते. त्यांना फार गाढ झोंप लागली असावी असें वाटे. त्यांचा श्वासोश्वास फार संथ व खोल होत होता. त्यांच्या बाहुपाशांत सहेली होती. तिचा नेहमींचा सैलसा अंबाडा ओघळून केस मोकळे सुटले होते. त्या केसांच्या काळयाभोर रेषा पांढऱ्याशुभ्र चादरीवर विखुरल्या होत्या. कॅप्टनसाहेबांनीं तिला झोंपेंत हृदयाशीं घट्ट ओढून धरलें होतें.

प्रतापनें हांक मारली,

'कॅप्टनसाहेब, कॅप्टनमंत्री, कॅप्टनसाहेब—'

अखेरीस कॅप्टनसाहेबांनीं किलकिले डोळे करून प्रतापकडे पाहिलें व अर्धवट झोंपेंत उठून ते म्हणाले,

'कोण आहे ? काय काम आहे ? नी इथं कसें आलांत तुम्ही ? दया, बोल इथं कां येऊं दिलंस त्याला ?'

प्रतापच्या मागोमाग आलेली दया थरथर कांपत होती. काय बोलावें तें तिला सुचेना.

आपल्या नांवाचा एकेरी उल्लेख केलेला पाहून प्रतापचा राग आवरेना, पण मोठ्या प्रयासानें राग आवरून शक्य तितक्या शांत स्वरांत तो म्हणाला,

'मी आपणहून आलों. मला कुणीहि येऊं दिलं नाहीं. आपण मुकाट्यानं माझ्याबरोबर चला. तिकडं तुमचे पेशंट मरायला टेकले आणि तुम्हांला इथं दारू नी विलास सुचतात—'

'चूप' ओरडून कॅप्टनसाहेब म्हणाले. यावेळीं ते उठून उभे राहिले.

सहेलीही खडबडून जागी झाली व थरथरत्या हातानें वस्त्र नीट करूं लागली.

'मरूं दे पेशंट. चालता हो. ओळखत नाहीं तुला मी. जाव, यू इडियट, डँबीस.'

कॅप्टन साहेबांचें तोंड लालबुंद झालें होतें. त्यांनीं अधरोष्ठ दातांनीं दाबून धरला व भुंवया ओढून घेतल्या.

परंतु अधिक शांत होऊन प्रताप म्हणाला,

'आपल्याला यावंच लागेल. तुमच्यासाठीं मी गाडी आणली आहे मुद्दाम.'

'जाव, जाव. बदमाश अपरात्रीं बंगल्यांत शिरतोस. जाव साला.'

'हें पहा शिव्या देऊं नका. तुम्हाला आलंच पाहिजे. या सिस्टर नेहमींच्याच आहेत.'

कॅप्टनसाहेबांना राग आवरला नाहीं. टेबलचें ड्रॉव्हर त्यांनीं खसकन ओढलें व त्यांतून रिव्हॉल्वर काढलें.

रिव्हॉल्वर काढतांच कॅप्टनसाहेब काय करणार आहेत त्याची कल्पना प्रतापला आली. मोठ्या चपलतेनें तो मागें सरकला.

कॅप्टनसाहेबांना फक्त एवढेंच समजलें कीं रिव्हॉल्वर मधून गोळी सुटली, त्यानें खिडकीचें तावदान खळकन् फुटलें. त्याच्या पाठोपाठ कसचा तरी प्रहार आपल्या मस्तकावर झाला हेंही त्यांना कळलें. त्याच्या असह्य वेदना होऊन त्यांनीं आपलें शरीर बिछान्यावर टाकलें.

त्यानंतर दुसरें दिवशीं सकाळीं पावसाची झड थांबली होती. प्रारंभीचें आरक्त, कोंवळें सूर्यकिरण अद्याप सर्वदूर पोंचले नव्हते. मात्र त्याचा सौम्य झोत पूर्वेकडच्या खिडकींतून संध्येच्या वक्षःस्थलावर पडला होता. त्याची ऊब संध्येला सुसह्य वाटत होती.

तिला आज कालपेक्षां पुष्कळच बरें वाटत होतें. कारण डॉ. ब्रगंझानें सुमारें अर्ध्यातासापूर्वी तिला इंजेक्शन दिलें. तो त्याचा परिणाम असेल किंवा निवळलेल्या हवेचा तो परिणाम असेल परंतु तिला कालपेक्षां पुष्कळच बरें वाटत होतें हें मात्र खरें ! आज तिला मोठी हुषारी वाटूं लागली होती. म्हणून, तिचे कपडे बदलायला जी नर्स आली होती तिला प्रथम तिनें ‘ गुडमॉर्निंग ’ केलें, व कॉफी ऐवजी कोको आल्यास उत्तम, अशी इच्छा तिनें आपणहून प्रगट केली.

ती प्रतापला तरी स्वस्थ बसूं देत होती म्हणतां काय ? छे—! ताज्या टाईम्सचा एक स्तंभ वाचून पूर्ण करतां करतां संध्येच्या प्रश्नांनाही त्याला सारखी उत्तरें द्यावी लागत.

इतक्यांत नर्सनें प्रतापला एक पत्र आणून दिलें.

**श्री. प्रतापराव यांना स. न. वि. वि.**

**काल रात्रीं जी विचित्र घटना झाली त्याबद्दल मला फार खेद होत आहे. त्याबद्दल मला आपल्याशीं कांहीं बोलायचें आहे. तरी तुम्हांला सवड होईल तेव्हां याल काय? वेळ कळल्यास गाडी पाठवून देईन. पपा बिछान्यावर पडून आहेत. डॉ. ब्रगंझा त्यांना नुकतेच पाहून गेलेत.**

**कृपाकरून वेळ कळवा. काम अती महत्वाचें आहे.**

आपली

**दया मंत्री**

प्रतापनें त्यावर क्षणभर विचार केला. त्याच पत्राच्याखालीं त्यानें एवढेंच लिहिलें ' आज दुपारीं दोन वाजतां—'

मग त्यानें तें पत्र नर्सला परत केलें.

बरोबर पावणेदोन वाजतां कॅप्टनसाहेबांची कोरी करकरीत डॉजेट गाडी आली. सगळे मळके ढग पांगून आकाशांतून निघून गेल्यानें आकाशाचा मंद निळसर रंग मनोहर वाटत होता. वारा मात्र भिरीभिरी वाहत होता.

प्रतापचें स्वागत करायला दया पोर्चच्या पायऱ्याशीं उभी होती.

मोटारींतून उतरतांच तिनें नमस्कार केला व म्हणाली, ' या. '

बंगल्याचें दार लोटून तिनें प्रतापला विचारलें, ' काय ? दिवाणखान्यांत बसतां कीं माझ्या खोलींत—'

' कुठंही...परंतु तुमच्या खोलींत बसणं मी अधिक पसंत करीन. '

' ठीक, चला ना. '

दयेच्या मागोमाग प्रताप आंत गेला.

तिची ती खोली फारशी मोठी नव्हती, तसेंच त्या खोलींत म्हणण्यासारखें असें फारसें किंमती सामानही नव्हतें. एका कोंपऱ्यांत दयेचा लिहिण्याचा छोटासा टेबल नि गादीची खुर्ची होती. खुर्चीच्या गादीवर आभाळी रंगाचें मखमली आवरण होतें. दुसऱ्या कोंपऱ्यांत ऑर्गन होता व त्यांवर फुलदाणी होती. फुलदाणींत गुलाबाचीं पूर्ण उमललेलीं फुलं होतीं.

खोलीच्या मधोमध चार माणसें बसतील एवढा मोठा कोच होता. त्या कोचाची व बाजूच्या दोन खुर्च्यांची गादी फार फुगीर होती. परंतु त्या फुगीर-पणापेक्षां त्या गाद्यांवर सौम्य रंगांत जीं चित्रविचित्र वर्तुळें नि चौकोन काढले होते ते कुणाच्याही डोळ्यांत प्रथम भरत.

तिची ती साधी, सुंदर व कलावंताच्या आवडीनें ठेवलेली नीटनेटकी खोली त्या एवढ्या मोठ्या बंगल्यांत एखाद्या विशाल हृदयांत राहणाऱ्या नाजूक रहस्याप्रमाणें त्याला वाटली.

बसून प्रतापनं विचारलं,

' तुमची ही खोली फारच सुंदर आहे. '

परंतु मला नाहीं तितकीशी सुंदर वाटत.'

'बरोबर आहे. तुम्हाला तितकीशी सुंदर वाटणं शक्यच नाहीं.'

'म्हणजे...'

'हा जो षट्कोनी आरसा आहे तेवढा फोडून टाकल्याशिवाय तुम्हाला तुमच्यापलिकडे दुसरं काय सुंदर दिसणार आहे?'

प्रताप असं बोलून गेला खरा! परंतु त्याला वाटलें काय वेडेपणा केला आपण! मुळीसुद्धां ओळख नसतां आपण तिच्या सौंदर्याची स्तुती करायला सुरुवात केली. किंवा तरुण स्त्रीच्या पहिल्या भेटींतलं पहिलें वाक्य तिच्या सौंदर्याची स्तुती करण्यासाठीं मनुष्यानें उच्चारावें असा त्याचा निसर्गधर्मच आहे?

आपली पाणीदार नजर उचलून प्रतापनें दयेकडे पाहिलें. ती फार ओशाळून गेली होती.

परंतु जसजसा प्रताप दयेकडे पाहूं लागला तसतसें त्याला वाटूं लागलें, छ आपण बोललों हे अप्रस्तुत असेल कदाचित्, परंतु तसं असलं म्हणून तें खोटं कां आहे? दयेला सुंदर नाही म्हणायचं तर मग सौंदर्याची व्याख्या तरी बुद्धिमान लोकांनीं कशावरून ठरवली?

किती डौलदार होता तिचा बांधा! वर्णानें ती गोरी होती. फिक्या पारव्या रंगाचें तिचे पातळ होतें! त्या पातळांच्या रुंद जरीकांठानीं अर्धवट झांकून घेतलेल्या तिच्या टपोऱ्या वक्षःस्थलाचें स्पंदन सावकाश होत होतें. तिच्या गालाचीं हाडें किंचितशीं वर आल्यासारखीं दिसत. तिचा कटिप्रदेश नाजूक होता. तिच्या डौलदार नितंबापर्यंत नी जंघापर्यंत वाढत जाणाऱ्या शरिराचें उगमस्थान म्हणून पाहणाऱ्याला तो तिचा कटिप्रदेश मोठा लाडीक दिसे. विलाशी राहणीमुळें तिचे काळीदार डोळे कांहींसे धुंद वाटत.

दयेनें वर पाहिलें. तेव्हां तिच्या मानेचा गोरा नि नाजुक स्तंभ प्रतापला मोहक वाटला.

स्तब्धता भंग करण्यासाठीं म्हणून दया म्हणाली,

'चहा घेणार ना?'

'हो घेऊं या.'

चहा आल्यानंतर चहा घेत घेत दया म्हणाली,

'तुमच्या वहिनी कशा आहेत?'

'बऱ्या आहेत. आज सकाळींच ब्रॅगंझानं इंजेक्शन दिलं.'

'आपल्याला मला एक विनंती करायची आहे.'

'बोला ना.'

'कृपाकरून काल रात्रीच्या प्रकाराबद्दल कुठंही बोलूं नका. तें सगळं विसरून जा. पपा बरें झाले कीं तुमची क्षमा मागतीलच...'

'छे, छे, उलट मीच त्यांची क्षमा मागायला पाहिजे. फ्लॉवरपॉट त्यांच्या डोक्यांवर मारतांना मला कांहींच कसं सुचलं नाहीं!'

'त्याबद्दल तुम्ही मुळींसुद्धां वाईट वाटून घेऊं नका. मला तुम्ही तसं वचन द्यायला पाहिजे.'

दयेनें पुढें केलेला हात हातांत घेऊन प्रतापनें तिची नाजूक बोटें दाबली.

तिचा निरोप घेऊन प्रताप गाडींत येऊन बसला.

त्याला वाटलें, झालें! ह्या देखण्या नि प्रसन्न मुलीचा सहवास फारच अल्पकाल म्हटला पाहिजे. झोंपेंत बाजूच्या विणेवर हात पडून त्या अचानक स्पर्शानें मधुर गीतलहरी उमटून जावी त्याप्रमाणें त्याला दया वाटली.

६

# गालावरचे अश्रू--

कांहीं माणसांचे स्वभावच असे असतात कीं, ज्या व्यक्तीसाठीं पडेल तें काम करण्याची त्यांची तयारी असते, ज्या व्यक्तीसाठीं निंदेचे, टिकेचे अगर जगाचे अन्य दुष्ट प्रहार ते मोठ्या धैर्यानें झेलतात त्या व्यक्तीसाठीं म्हणून कांहीं मर्यादा त्यांनीं आंखल्या असतात. जुन्या मोंगल दरबारांत ज्याप्रमाणें जनानखान्याला चिकाच्या पडद्याची हद्द उल्लंघतां येत नसे त्याप्रमाणें असल्या व्यक्तीची सत्ता कांहीं विवक्षित बंधनें उल्लंघून जाऊं शकत नाहीं. मग त्याचें मनांतल्या मनांत मोठें आश्चर्य वाटूं लागतें कीं, स्वार्थत्यागाच्या, सेवेच्या नी उत्कट प्रेमाच्या कमानी ज्या व्यक्तींच्या जीवित मार्गावर त्यानें उभारल्या त्यानें एवढ्या तेवढ्या गोष्टींत आडपडदा राखून मोठ्या हट्टानें त्या व्यक्तीला आपल्यापासून कांहीं अंतर राखून ठेवावें तें काय म्हणून !

प्रतापच्या बाबतींत असेंच नवल वाटण्यासारखें होतें !

संध्येसाठीं त्याला जेवढें करतां येण्यासारखें होतें तेवढं त्यानें केलें. तिच्या अडचणींच्या वेळीं त्यानें तिला बहुमोल मदत केली. एखाद्या इमानी स्नेह्याप्रमाणें

तो तिच्याशी वागला. अन् ते इतक्या एकनिष्ठपणें कीं आपल्याला आपल खाजगी जीवन आहे हेंही तो या धांदलींत नि गडबडींत विसरून गेला.

परंतु असेंही होतें, तरी त्यानें मोठ्या हट्टानें कॅप्टन मंत्रीच्या येथें घडलेला प्रसंग संध्येला सांगितला नाहीं. दयेची व त्याची ओळख झाली हेंही पण न सांगण्याचेंच त्यानें ठरवलें. त्यावेळीं त्याचें मन त्याला मोठ्या हट्टानं म्हणालें, हूं. वहिनीला सगळ्याच गोष्टी काय म्हणून सांगाव्यात? तिनं आपल्यावर हा अधिकार काय म्हणून गाजवावा? आपण आपलं जीवन–सर्वस्व कांहीं तिच्या चरणावर वाहिलं नाहीं. मग असं जर आहे तर साध्या साध्या गोष्टीतही तिला भागीदार केलं पाहिजे असा हट्ट काय कामाचा?

......दुपारचे तीन वाजले होते.

संध्या आपल्या शय्येवर पडली होती. जवळच प्रताप एक कादंबरी वाचत होता. नर्स संध्येसाठीं कॉफी घेऊन आली त्यावेळीं संध्या ह्मणाली,

'कॉफी घ्याल ना?'

'नको नुक्ताच चहा झाला माझा. शिवाय कालपासनं माझं पोट बरं नाहीं.'

'कां?...'

प्रतापनें संध्येकडे पाहिलं. त्यानंतर तो कांहींच बोलला नाहीं.

इतक्यांत दवाखान्यांतला नोकर येऊन त्यानें प्रतापला फोनवर बोलावल्याचें सांगितलें.

टेलिफोनचा रिसीव्हर प्रतापनें कानाला लावला.

'हॅलो, हॅलो...'

'कोण? प्रतापराव?'

'होय. तुम्ही मिस् मंत्री, होय ना?'

'होय, मी दया. असं पहा, मला तुम्हाला एक विनंती करायची आहे.'

'मलाही तुम्हाला एक विनंती करायची आहे. ती अशी कीं प्रत्येक वेळेला विनंतीची नि कृपेची भाषा वापरणार असाल तर बोलणं मला कठीण होईल.'

‘ सो सॉरी. बरं पपा तुम्हाला भेटूं इच्छितात तर तुम्ही कृपाकरून, नो, नो व्हेरी सॉरी–तुम्ही आतां यावें...’

‘ ठीक आहे. ’

‘ अन् हें पहा मी गाडी पाठवतेच. ’

‘ थॅंक्स. ’

मग थोड्याच वेळांत कॅप्टन साहेबांची गाडी येऊन प्रतापला घेऊन गेली.

प्रताप जाऊन पोंचला तेव्हां कॅप्टन साहेब त्याचीच वाट पाहत दिवाण-खान्यांत बसले होते.

प्रतापनें आंत प्रवेश करतांच ते घाईघाईनें हंसून उठले व त्याला सामोरा गेले. त्यावेळीं त्यांची ती लगबग व धांदल पाहून प्रतापला हंसू आलें, पण तें त्यानें मोठ्या कष्टानें आवरलें. त्याला पाहतांच त्यांनीं रबरी सपाता पायांत चट्कन घातल्या व आपल्या विस्तीर्ण वर्तुळाकार पोटावरून पांढऱ्या शुभ्र झग्याभोंवतीं बांधलेल्या दोरीचे रेशमी गोंडे चाचपले. मग त्यांनीं हस्तांदोलनासाठीं प्रतापपुढें हात केला. त्यावेळीं कॅप्टन साहेबांच्या पोटाचा स्पर्श त्याच्या बोटांना झाला.

प्रतापला त्याची गंमत वाटली.

बसल्यावर प्रतापच्या ध्यानांत आलें कीं दया तेथें नाहीं. परंतु तें त्याच्या लक्षांत येतें न येतें तोंच दया तेथें आली. त्याला नमस्कार करतांना दयेनें आपले मस्तक किंचित नमविलें त्यावेळीं तिनें आपली केशभूषा नुक्तीच संपवली असावी, असें प्रतापला वाटलें.

दयेनें एक छोटा टेबल त्याच्या नी कॅप्टन साहेबांच्या मध्यें मांडला तेव्हां त्याचा अर्थ समजून प्रताप म्हणाला,

‘ हे पहा कॅप्टनसाहेब, मला आतां खायला कांहीं सुद्धां नको.’

‘ त्याचं असं आहे मि. प्रताप, आमची दया यंदा एम्. ए. झाली. त्यानंतर...’

‘ असं कां ! ’ प्रताप मध्येंच उद्गारला.

त्यानें तिच्याकडे अशा नजरेनं पाहिलें की जणूं काय दयेला त्याला म्हणायचें होतें, ‘असं कां ! आतां तुला विदुषी समजून मला बोलायचालायला पाहिजे यापुढं. ’

दयेनें खाली गालिच्याकडे पाहिलें. मग तिने तो अभिप्राय ओळखला किंवा काय कुणास ठाऊक ! कॅप्टनसाहेब पुढें म्हणाले.

'......त्यानंतर हिनं आमच्या इथला स्वयंपाकघराचा चार्ज घेतला. तेव्हांपासून स्वयंपाकघरांत मी कधींही लुडबुड करीत नाहीं तिला पाहिजे तेव्हां अन् पाहिजे तें तिनं आम्हाला खायला घालावं.'

'परंतु तिथं तुम्ही लक्ष द्यावं असं मी म्हणतच नाहीं मुळीं.'

'मग ?'

'माझं म्हणणं इतकंच कीं, त्यांना इथं मज्जाव करा. तुम्ही इथं लक्ष द्या.

त्यावर ते तिघेही मोकळेपणानें हंसले.

मग नोकरानें खाद्यवस्तूंचा ढीग बशांतून आणला. त्याचा समाचार घेत-घेत ते निरनिराळ्या विषयावर बोलत होते. अशाच कोणत्या तरी विषयावर ते बोलत असतां मध्येंच कॅप्टनसाहेब म्हणाले,

'तुमच्या वहिनीची तब्येत कशी काय आहे ?'

'ठीक आहे.'

'सकाळीं ब्रॅगंझा म्हणतच होता. मला वाटतं आतां त्यांना दोनचार दिवसापेक्षां जास्त दिवस राहण्याची जरूरी पडणार नाहीं.'

'होय. तिची प्रकृतीही आतां पुष्कळच सुधारली. आपले ह्याबद्दल आभार मानले नाहींत तर कृतघ्नपणा होईल मोठा.'

'छे, छे प्रताप.....' कॅप्टनसाहेब घाईनें म्हणाले. किंचित् थांबून ते पुढें म्हणाले,

'तुमच्याबद्दल दयेनं मला जी माहिती दिली तेवढ्यावरून मी तुम्हांला भेटण्याचा निश्चय केला. मी तुम्हांला भेटीला बोलावलं तेव्हांच तुमच्या ध्यानांत आलं असलं पाहिजे कीं झालेल्या प्रकाराबद्दल दिलगिरीची भाषा कॅप्टनसाहेब काढणार असतील म्हणून......अन् हें खरंही पण आहे. माझं अन् सहेलीचं नातं इतक्या निर्लज्जपणानं माझ्या मुलीपुढं जाहीर व्हावं ही केवढ्या खेदाची गोष्ट आहे ! परंतु त्या दिवशीं......'

प्रतापच्या कानाशीं कॅप्टनसाहेब म्हणाले,

'I had taken whisky neat.'

'नीट म्हणजे ?'

'सोड्याशिवाय...एखाद्या रविवारी आयुष्य फारच निरस वाटूं लागलं म्हणजे घ्यावी लागते.'

कॅप्टन साहेबांनीं आपली नजर शून्यांत रोखली.

त्यानंतर ते बराच वेळ बोलत राहिले.

एवढें मात्र खरें कीं, ज्यावेळीं प्रताप कॅप्टन साहेबांचा अन् दयेचा निरोप घेऊन गाडींत येऊन बसला त्यावेळीं कॅप्टनसाहेबांच्या स्वभावाबद्दल आदराचे भाव त्याच्या अंतःकरणांत नव्हते. त्यांच्या बोलण्यांत त्याला हें समजलें कीं, दयेला जन्म देऊन लगेच तिला तिची आई एकटी सोडून गेली होती. इतका अफाट पैसा मिळवूनही त्यांनीं आपल्या एकुलत्या एक मुलीच्या कल्याणासाठीं दुसरें लग्न केलें नव्हतें. परंतु असेंही जरी होतें तरी कॅप्टन साहेबांच्याबद्दल त्याला फारसा आदर वाटला नाहीं.

कॅप्टनसाहेबांच्या आमंत्रणावरून तो रोज त्यांच्याकडे जात असे. कॅप्टन साहेबांच्या डोक्यावरचे बँडेज अद्याप सोडलें नव्हतें. त्यांना बिछान्यावर पडूं देऊन अगर कोचावर रेलूं देऊन त्यांच्याशीं दीडदोन तास प्रताप गप्पा मारत बसे. दुपारचे चार वाजले म्हणजे कॅप्टन साहेबांची गाडी प्रतापला घ्यायला म्हणून यायची अन् बरोबर साडेपांच वाजतां कॅप्टनसाहेब म्हणत, 'बराय प्रताप...मी पडतों जरा. तुम्ही अन् दया बोलत बसा. दया, जरा डॉक्टरला पाठवून दे...!

प्रतापचा हा कार्यक्रम मोठा आवडता झाला होता. त्यामुळें सोमवारीं संध्याकाळच्या मेलनें संध्येला परत नेण्याची परवानगी ज्यावेळीं कॅ. मंत्रींनीं दिली त्यावेळीं प्रतापचें मन काहींसें खेदानें भरून गेलें. क्षितीजावर उमटून एखाद्या चांदणीनें मन वेधून घ्यावें अन् ती तर स्पर्शाच्या कक्षेबाहेर असावी त्याप्रमाणें दया त्याला वाटली. तो मुंबई सोडून जात होता खरा ! परंतु त्याचे जीवितधागे कुठेंतरी गुंतले जाऊन त्यानें त्याच्या मनाची मोठी ओढाताण होऊं

लागला. संध्या बरी झाली ह्याचा आनंद आणि दयेच्या चिरवियोगाची दुःसह कल्पना ह्यानें त्याचें अंतःकरण भरून गेलें.

तो रविवारचा दिवस होता. उद्या निघायचं म्हणून प्रतापनें बरीचशी खरेदी केली. त्यानें स्वतःसाठीं म्हणून कांहीं कापड खरेदी केलें. संध्याकाळीं अगर सकाळीं फिरायला जातांना त्याला हातांत काठी घेऊन जाण्याची संवय होती, म्हणून त्यानें दोन काठ्या खरेदी केल्या, संध्येला नकळत त्यानें तिच्यासाठीं दोन जरीचीं पातळें खरेदी केलीं‌त.

हॉटेलच्या खोलींत तो आपल्या सामानाची आवराआवर करत असतां त्याला टेलिफोनवर बोलावलं,

'हॅलो, हॅलो, कोण प्रताप...'

'हं, हं...तुम्ही दया, हं काय?'

'पपाच्या वतीनं तुम्हांला आज रात्रीं आठ वाजतां जेवायचं आमंत्रण देतें मी. सबब ऐकणार नाहीं मी. तुम्ही उद्यां जायचं म्हणून समजलं... टाळण्याचा प्रयत्न चालू देणार नाहीं.'

'ठीक आहे. येईन मी.'

'ओ, थँक्स ऑफुली.'

त्यानंतर कॅप्टनसाहेबांकडे जेवणासाठीं म्हणून प्रताप बरोबर आठ वाजतां गेला.

दयेनें जेवणाचा थाट अपूर्व असा केला होता. ज्या छोटेखानी वर्तुळाकार मेजावर ते जेवण घेत होते त्या मेजावर पिवळ्या रंगाचे जाळीदार वस्त्र टाकलें होतें. त्या आवरणावर नि आपल्या मांडीवर जो टॉवेल प्रतापनें टाकला होता त्यांवर हलक्या हातानें गुलाबपाणी शिंपलें असलें पाहिजे हें निश्चित होतें. कारण असें कीं, समोरच्या प्लेटमध्यें येऊन पडणाऱ्या सुग्रास अन्नाची गरम वाफ प्रतापच्या तोंडावर येई त्यावेळीं त्यांत कसला तरी मंदमधुर सुवास मिसळून त्याचा वास अधिकच प्रिय वाटे.

त्यांचं जेवण आटोपलें त्यावेळीं नऊ वाजले.

कॅप्टनसाहेब नि प्रताप सावकाश धूम्रपान करीत होते. दया कॅप्टन-साहेबांच्या कोचावर बसली होती. तिच्या रुंद कपाळावर टपोरे स्वेदबिंदू चमकत होते. प्रतापनें दयेकडे निरखून पाहिलें तेवढ्या अवधींत तिनें ते दोनदां तरी टिपून घेतले.

इतक्यांत नोकर येऊन त्यानें टेलिफोनवर कॅप्टनसाहेबांना बोलावल्याचें सांगितलें.

कॅप्टन साहेब गेले हें पाहून प्रताप दयेला म्हणाला,

' आजच्या स्वयंपाकाबद्दल तुमचं अभिनंदन करतों मी. '

' कां बाई ? '

' सुशिक्षित मुलगी स्वयंपाकघरांत इतकं लक्षपूर्वक मन घालते हें पहिल्यांदाच पाहतों मी. '

त्यांवर दयेनें लाजून खालीं पाहिलें.

' जाण्यापूर्वी तुमचं गाणं ऐकायचं आहे मला. '

' माझं ? '

' कां, म्हणजे तुह्माला गाता येत नाहीं ? '

' येतं कीं, परंतु तुम्हाला कसं कळलं हें ? '

' तुमच्या खोलींतील ऑर्गन पाह्यला मी. '

कॅप्टन साहेब बाहेर जायचा पोषाख करून आले तेव्हां दयेनें विचारलें,

' कुठं जाणार पपा ? '

' पेशंट अत्यवस्थ आहे. आत्तांच कॉल आला बघ. तुम्ही बसा ना प्रताप.'

कॅप्टनसाहेब निघून गेले. त्यांच्या मोटारचा आवाज दूरदूर ऐकूं येऊन जिकडे तिकडे स्तब्ध झालें. दया मोठ्या उत्साहानें गाण्याला उठली खरी परंतु तिचा तो उत्साह पार मावळून गेला. कारण लागोपाठ तिला दोनदां टेलिफोनवर जावें लागलें.

' हॅलो, हॅलो कॅ. मंत्री होय ना ? '

' हं, हं '

'मी रूथ, निवणार कीं नाहीं लवकर? अहो साहेब, आज तुमच्या हेल्थसाठीं टोस्ट प्रपोज करणार आहेत ना सारी मंडळी. अन् हें पहा मागच्या पार्टीप्रमाणें नेमके कॉकटेलच्या वेळीं हजर, हें चालूं देणार नाहीं. थट्टा नाहीं. क्लबची सेक्रेटरी आहे मी......'

दयेनें फोन बंद केला.

दुसऱ्यांदा खुद्द कॅप्टनसाहेब तिच्याशीं बोलत होते,

'हॅलो, हॅलो, कोण, दया?'

'यस्, पपा.'

"बेटा, मला रात्रीं केव्हां येता येईल तें सांगतां येत नाहीं. फार सीरीयस् केस आहे. झोंप तूं अन् हें बघ त्या प्रतापांना जायला सांग..."

'बरं, बरं...''

तिनें मोठ्या झणकाऱ्यानें रिसीव्हर ठेऊन दिला. दयेनें प्रतापला आपल्या खोलींत नेलें. मग ती ऑर्गनवर गायला बसली.

तिनें त्यावेळीं कपाळावरचे नि भांगांतले स्वेदबिंदू हलक्या हातानें टिपून घेतले, अधरोष्ठावरून जिवणी फिरवली नि आपल्या पातळाची रुंद किनार वक्षःस्थलावर नीट केली.

तिनें गायला सुरुवात केली: —

सख्या! इतुकी घाई तुला कमली होई?
थांब, नको रे जाऊं माळ अपुरी राही!
फुलें गुंफूं दे आतां नको तुडवूं जातां
माळेपरीस माझें भग्न हृदय तेंही!
सदा रुचलीं तुला त्याच वेंचिलें फुलां
कसा रुसवा असा आला तुजला बाई?
पुरी होतांच माळ गळां आपुल्या घाल
तोच सोहळा डोळां मला विलोकूं देई!
नाहीं बळेंच केला वेळ गुंफाया माला
हात चालेना—कांपे— काय करूं मी तरी?

लोट आंसवां येई क्षण दिसेना कांहीं
सख्या ! म्हणूनही रे माळ होईना पुरी !
काय येईना दया ? होशी अधीर जाया !
हीच विनती अंतीं एक तितुकी तरी !
लाव हृदयीं माळा म्हण आपुली तिला
राहो अपुरी राहे ! चिंब आंसवें जरी !

दया गात होती त्यावेळीं प्रताप अनिमिष नेत्रांनीं पाहत होता. तिच्या गळयांतून निघणाऱ्या भावपूर्ण स्वरलहरींनीं त्याच्या मनोवृत्ती बहरून गेल्या.

दयेचें गाणें थांबलें.

आणि मग सिंहासनाच्या पायऱ्या उतरून राजकन्या जाऊं लागतांच तिचें बहुमोलाचें राजवस्त्र उचलून तिच्या पाठोपाठ दासींनीं निघून जावें त्याप्रमाणें गाण्याच्या मागें रेंगाळणाऱ्या गीतलहरीही चालत्या झाल्या.

दया आपल्या जागेवरून उठली नाहीं म्हणून प्रताप उठून जवळ गेला नि म्हणाला,

'किती सुंदर गाता तुम्ही. परंतु हें काय...?'

झालें ! दयेची धडपड व्यर्थ ठरली. तिचे अश्रू अनिर्बंधपणें वाहूं लागले.

'काय झालं तुम्हांला ? माझ्यामुळं तर कांहीं त्रास...'

'छे, छे. .' दयेच्यानें पुढें बोलवलें गेलें नाहीं. ओंजळींत तोंड झांकून ती रडूं लागली. प्रतापनें आत्यंतिक सहानुभूतीनें तिच्या गौर मानेवर ओघळलेल्या अंबाड्यावर आपला हात ठेवला.

दयेनें असे अश्रू कां गाळावे हें प्रतापला समजेना !

प्रताप अस्वस्थ झाला. त्याला दयेबद्दल अनुकंपा वाटली, आपुलकीही वाटली. अधीर होऊन त्यानें तिच्या गालावरील अश्रू मधल्या बोटानें टिपून घेतले.

मग त्याला हें माहीत नव्हतें काय कीं, प्रीति वटवाघुळाच्या एका जातीसारखी आहे. दंश करतांना ती आपल्या पंखांनीं हळुवार वारा घालते, त्यानंतरच्या यातना धड जगूंही देत नाहींत अन् मरूंही देत नाहींत !

कुणास ठाऊक !

७

# अंधारांतून आलेला तीर--

त्यानंतर प्रतापवर एक विलक्षण आपत्ती ओढवली.

संध्येला घेऊन तो नागपूरला गेला त्याच्या दुसऱ्या दिवसाचीच गोष्ट !

प्रतापच्या मालगुजारीच्या गांवाहून त्याचा एक दिवाणजी आला तो एक अत्यंत प्रक्षोभक बातमी घेऊन ! त्याच्या वडिलांचें देहावसान झालें होतें. माणिकरावांना सुमारें दोन दिवसांपूर्वी ताप येऊं लागून कुणालाही त्याची कल्पना येऊं न देतां माणिकरावांना घेऊन चालता झाला. अवघ्या दोन दिवसांच्या तापानें एक हुषार व प्रामाणिक जमीनदार नाहींसा झाला, प्रतापच्या मस्तकावरचें पित्याचें छत्र नाहीसें झालें, आणि चाहूल लागूं न देतां दुर्दैवानें अशी शिकार साधली कीं या यशाबद्दल त्याचे त्यालाच खदखदून हंसायला यावें.

परंतु एवढ्यानं संपलें असें थोडेंच आहे ! दुर्दैवाला शेवट आहे असें जे तुम्ही आम्ही म्हणतो ते किती वेडे म्हणावेत ! माणिकरावांच्या और्ध्वदेहिक क्रियेंतून मोकळा होतांच त्यानें इस्टेटीचे कागदपत्र पाहण्यास सुरुवात केली. त्याला त्यांत जें कळून आलें तेंही मोठेंच गंभीर होतें.

त्याचा माल्गुजारी गांव शेख करीम नांवाच्या श्रीमान जमिनदाराकडे गहाण होता, आणि तोही फार मोठ्या भारी रकमेसाठीं......!

याबद्दल त्यानें भाऊसाहेबांना विचारलें तेव्हां त्यांनीं कानावर हात ठेवले. ते म्हणाले,

'मी तरी काय सांगूं, प्रताप. दादांनीं हा गांव स्वतःच मिळवला नि स्वतःच गमावला. कुळाला किती सवलती दिल्या त्यांनीं! उपकार, उपकार दुसऱ्यावर करायचे त्याला कांहीं सीमा नको कां? शिवाय......'

'शिवाय काय?'

'तुझं लक्ष असायला पाहिजे होतं थोडंफार इकडे.'

'झालं तें झालं. पण यावर आतां कोणता उपाय?'

'शेखला या गांवाची विक्री करून देणं एवढाच उपाय दिसतो मला.'

'हं......हं, ठीक आहे.'

मग प्रतापनें शेख करीमला आपल्या गांवाची विक्री करून दिली.

या सगळ्या क्षोभजनक भानगडींत प्रतापचा एक महिना निघून गेला.

× × ×

आक्टोबर आता सरता झाला होता.

पावसाचे दिवस संपले होते. बाजारांत भाजीपाला जास्त जास्त येऊं लागला. मोकळ्या मैदानावर नि पाणथळीच्या कांठाकांठनें हिरवे हिरवे तृणांकुर उगवले. गाई, बैल, म्हशी, हेले, बकऱ्या, मेंढे अधिकाधिक धष्टपुष्ट दिसूं लागले. सकाळीं अन् सायंकाळीं गाई म्हशींचीं खिल्लारें गांवाबाहेर जातांना नि गावांत येतांना धूळ फारच कमी उडत होती. कारण वर्षाऋतूंत पाण्याचे हबके बसल्यानें सगळी धूळ तलम पातळाप्रमाणें सृष्टीच्या अंगालगत चोपून बसली होती. परंतु इतकेंही असले तरी उष्मा फारच भासत होता. ऐन दुपारीं तर सगळी सृष्टी एखाद्या रसरशीत निखाऱ्याप्रमाणें भासे. आकाशांतील सगळे अवडंबर खालीं कोसळलें तरी अतृप्त सृष्टीची विरहव्यथा संपलीच नव्हती कीं काय कुणास ठाऊक!

प्रतापनें घड्याळाकडे पाहिलें. चार वाजले होते.

त्यानं आरामखुर्ची थोडी पुढें ओढली, आणि दारांतून बाहेर पाहूं लागला.

परंतु प्रतापचें जग बदललें म्हणून बाह्य जग बदलतें असें थोडेंच आहे. पूर्वीप्रमाणेंच तरुणमुलींनीं स्नो पावडरचे हलके हात आपल्या तोंडावरून फिरवले होते. कारकून मंडळी नि शिक्षकमंडळी घाईघाईनें सायकलवरून परतत होती- कारण त्यांच्या पत्नी चहाचें आधण टाकावयास एव्हांना उतावळ्या झाल्या असतील. बोटाभोंवतीं किल्याच्या झोकाची साखळी फिरवत, मनगटावरील घड्याळ पाहत अगर बोटांतील अंगठीचा खडा चाचपत कॉलेजचे विद्यार्थी त्याच्या दारा. समोरून गेले. डोक्यावर टोपलींत सामानाचा हारा तोलत एक पोरसवदा काळी सावळी रौताईन त्याच्या दारासमोरून गेली. तीहि आपल्या नेहमींच्याच लगबगीनें !

विझत आलेला चिरूट प्रतापनें रक्षापात्रांत टाकला. मग त्यानें पेटींतून दुसरा चिरूट काढून शिलगावला. टेबलवर पडलेले बँकबुक त्यानें उघडलें व शेवटची रक्कम पाहिली......तीनशे रुपये सहा आणे दोन पै......

प्रताप विषण्ण होऊन हंसला. तीनशे रुपये सहा आणे दोन पै......

एवढीच रक्कम त्याच्या हाताशीं आज शिल्लक होती. तीनशे रुपये !...... म्हणजे नेहमीच्या संवयीप्रमाणें तेवढी रक्कम दोन महिन्याच्या खर्चाला पुरणारी होती. फारच झाले असते तर तीन महिने......

तीन महिने, पण पुढें काय ?

पैशाबद्दल फारशी फिकीर न ठेवणाऱ्या वर्गात प्रताप मोडत होता. त्याला वेळोवेळीं लागणारी रक्कम वाटेल तशी तो मागवून घेई आणि तें सगळे पैसे तो हातोहात खर्चून टाकी. त्याचा हा उधळा स्वभाव झाला होता त्याचें कारण व्यवहारांत तो भोळसट होता. किंवा त्याच्या संवयी फाजील खर्चाच्या होत्या असें मात्र नाहीं. तर लहानपणापासून त्याच्या वडिलांनीं त्याला एकसारखे मुबलक पैसे त्याच्या हातीं खेळूं दिल्यानें एक तऱ्हेची बेदरकार वृत्ती निर्माण होऊन तो पैशाबद्दल अधिकाधिक बेफिकीर बनत चालला होता.

असें असल्यानें आज सकाळीं नागपुरांत येतांच त्याने बँकबुक प्रथम पाहिलें.

......प्रतापनें बँकबुक मिटवून टेबलवर ठेवलें.

तीनशे रुपये !!!

छे, छे हा प्रश्न ह्यापूर्वी त्याच्यापुढें कधींच आला नव्हता. त्याच्या बरोबर शिकणाऱ्या त्याच्या गरीब स्नेह्यांना त्यानें उदार हातानें मदत केली होती. त्यावेळीं त्याच्या मनाला शिवलेंसुद्धां नाहीं कीं एक दिवस आपणही ह्याच परिस्थितीचे वांटेकरी होणार म्हणून! फक्त तीनशे रुपये शिल्लक राहिले होते. वकिलीच्या धंद्याची स्थिती पूर्णपणें निराशामय होती. भाऊसाहेबांशीं त्याचें जमण्यासारखें नव्हतें. कारण ते त्याचे एकतर चुलत चुलते होते. शिवाय त्यांच्या पत्नीचा वरचष्मा होता. प्रताप गोंधळून गेला आणि त्यानें वर पाहून आपले डोळे मिटून घेतले.

प्रताप आपल्या उद्वेगजनक मनःस्थितींत इतका गुरफटला होता कीं संध्या आपल्या गाडींतून केव्हां उतरली तें त्याला समजलें सुद्धां नाहीं.

दारासमोरच्या पायरीवर येतांच संध्येनें प्रतापकडे पाहिलें. किती बदलला होता तो अवघ्या एकदीड महिन्यांत, त्याच्या गालाचीं हाडें वर आल्यासारखीं दिसत होतीं. त्याचे विशाल डोळे लांब पापण्यांनीं झांकून घेतले होते. परंतु डोळयाभोंवतालचीं वर्तुळें तेलकट दिसत होतीं. केस विस्कळले होते आणि आज सकाळी दाढी न घेतल्यानें त्याच्या गोऱ्या कांतीवर खुलणारी हिरवी श्मश्रूरेषा, तीहि काळवंडून गेली होती.

अवघ्या एकदीड महिन्यांत निष्ठुर प्रहार करणाऱ्या दुर्दैवाला काय म्हणावें तें संध्येला समजलें नाहीं.

हलक्या पावलांनीं संध्या आंत आली.

खोली झाडली सुद्धां नव्हती. कोपऱ्यांत होल्डऑल अर्धवट सुटलें होतें. पोर्टमँटोचें झांकण भिंतीशीं टेंकून उभे होतें. त्या उघड्या पोर्टमँटोंत तेलाची बाटली, पोमेडची डबी, केसांचा ब्रश नि कंगवा वेडावांकडा पडला होता. आंत पाणी नसल्यानें पाण्याचा खुजा पांढरट नि भेसूर दिसत होता. रक्षापात्र राखेच्या ढिगाऱ्यानें भरून गेलें होतें.

संध्येनें रक्षापात्राजवळचें बँकबुक घेतलें नि शेवटची रक्कम पाहिली.

तीनशे रुपये सहा आणे दोन पै......

तिनें खुर्ची घेऊन प्रतापच्या जवळ मांडली आणि त्याच्या कानाजवळ तोंड नेऊन म्हणाली,

' केव्हां आलांत तुम्ही ?'

त्याबरोबर प्रतापनें दचकून डोळे उघडले. घाईनें उठून तो म्हणाला,

' ओ, हो......वहिनी आतांच आलांत ना तुम्ही. काल रात्रीं जागरण झालं म्हणून उगाचच डोळा लागत होता. हं बोला पाहूं प्रथम, तुमची प्रकृती कशी काय आहे ती ?......'

संध्या कांहींच बोलली नाहीं. तिनें प्रतापकडे रोखून पाहिलें.

तिला वाटलें, किती खोटं बोलतात हे प्रताप ! पोटांत एक अन् ओठांत दुसरं असा ह्या पुरुषांचा वागण्याचा धर्मच आहे काय ? किंवा सगळ्यांनाच ह्या समाजांत असंच वागावं लागतं ? असं खोटं बोलण्याचं नाटक या जीवितांत हरघडी करावं लागतं म्हणूनच कां कवीनं जीविताला रंगभूमी म्हटलं ?......

संध्येच्या त्या कठोर दृष्टीनं प्रताप कांहींसा वरमला.

' फिरायला चलूं या आपण.'

' कुठं '

' सेमिनरी हिल्सकडं.'

' हो, चला ना, परंतु मी प्रथम केस धुवून येतो.'

प्रतापनें साबण व तेलाची बाटली घेतली व स्नानगृहाकडे तो पळतच गेला.

प्रताप स्नानगृहाकडे गेला हें पाहून संध्येनें ड्रायव्हरला हांक मारली.

' हे पहा, आपल्या गड्यांना उद्यां सकाळीं पाठवून ही खोली नीट लावून घ्यायला सांग. तूं जातीनं येऊन आपल्या देखरेखीखालीं काम करून घे. आनंदाश्रमांत जाऊन डबा बंद करायला सांग अन् काय बिल झालं असेल ते मला मागून घे. अन् हे नीट लक्षांत ठेव कीं भाऊजींच्या कोर्टांत जायच्या नि परत यायच्या वेळेवर गाडी आणत जा. आणि हें बघ......जातांना एम्पायर हॉटेलच्या तिथं गाडी थांबव. कारण त्यांनीं चहा घेतलेला दिसत नाहीं आज...

संध्येनें सांगितलेल्या सगळ्या गोष्टींची मनाशी उजळणी करत ड्रायव्हर आपल्या जागेवर जाऊन बसला.

प्रतापनें मग लवकरच पोषाख केला.

गाडी एम्पायर हॉटेलच्या समोर थांबली तेव्हां प्रताप म्हणाला.

‘ काय वहिनी. ’

‘ उतरा तुम्ही. चहा घऊं या. ’

‘ ठीक आहे. ’

त्यानंतर प्रतापनें व संध्येनें हॉटेलांत चहा घेतला.

सेमिनरी हिल्सकडे नेणाऱ्या काळ्याशार गुळगुळीत डांबरी सडकेवरूना ज्यावेळीं ड्रायव्हरनें मोटर ऐन वेगांत सोडली त्यावेळीं प्रतापला जरा बरें वाटलें.

कारण मावळतींतून प्रकाशकिरणांचा शेवटचा सोनेरी झोत डांबरी सडकेवर पडून ती विलक्षण तळपत होती. उंचावरून वाहणारे व शहरांत अनुभवाला न येणारे शीतल वारे मोठे सुखदायक वाटत होते.

रस्त्याची चढण लागतांच संध्येनें ड्रायव्हरला मोटार थांबवण्यास सांगितलें. मग ती प्रतापला म्हणाली,

‘ आपण जाऊं या फिरत फिरत थोडें दूर. ’

‘ चला ना. ’

प्रतापने सभोंवतीं पाहिलें आणि तेवढ्यानें त्याचे मन मोठें प्रसन्न झालें. त्याच्या उजव्या हाताच्या बाजुला टेकडीवर बड्या लोकांचे बंगले वसले होते. डाव्या हाताकडे खालांत गोल्फसाठीं विस्तीर्ण पटांगण होतें. प्रतापनें तिकडे पाहिलें त्यावेळीं एक गोरे जोडपें तेथें खेळत होतें. त्या व्यतिरिक्त त्या विस्तीर्ण निळिपदार पटांगणावर कुणीही नव्हतें.

मग प्रतापला वाटलें आपल्याला आपल्या खेदजनक विचारांचा विसर पाडण्यासाठीं संध्येनें फिरायला जाण्याची जागा मोठ्या चातुर्यानें निवडली.

‘ मी ड्रायव्हरकडनं निरोप पाठवून आनंदाश्रमांतला तुमचा डबा बंद करणार आहे, ’

‘ कां बुवा, उपाशी मारायचा बेत आहे की काय ? ’

तेव्हां हंसू न आवरल्यानें संध्या मोकळेपणानें हंसली.

‘ तसा माझा विचार नाहीं. ’

'मग ?'

'तुम्ही आमच्याकडं जेवायला यायला पाहिजे. या सगळ्यांच्या जोडीला तुमच्या शरीर प्रकृतीची आबाळ झालेली मला नाहीं खपायची. तुम्ही नाही म्हणाल तर मला तें आवडणार नाहीं.'

'पण मी नाहीं म्हणीन तर ना......

त्यावर संध्या पुन्हा हंसू लागली.

प्रताप हें बोलून गेला खरा! परंतु त्याला वाटलें आपण काय बोलून बसलों हें. आपल्या दुबळ्या परिस्थितीबद्दल अनुकंपा दाखवणाऱ्या एका मुलीजवळून ही एक तऱ्हेची भीकच नाही कां आपण स्वीकारत!

प्रतापच्या स्वाभिमानाला त्यानें मोठाच धक्का बसला. संध्येनें आपल्याला मदत करावी आणि त्याचा आपण स्वीकार करावा हें प्रतापला मोठें दुःसह झालें. कदाचित् दुसऱ्या कोणाकडून त्यानें मदतीचा स्वीकार केलाही असतां. परंतु संध्येसारख्या प्रियजनाकडून! अत्यंत आवडत्या माणसाकडून विपत्कालीं दयेची भीक स्वीकारण्यानें मानी माणसाला काय असह्य वेदना होतात म्हणायच्या!

लवकरच ते दोघेही परतले.

त्यानंतर दुसरे दिवशीं सकाळीं संध्येचे गडी येऊन निमूटपणानें त्याची खोली साफ करूं लागले. त्यांचेबरोबर संध्येचा ड्रायव्हरही होतांच. त्याला प्रतापनं विचारलें,

'कां रे ?

'साहेब, बाईसाहेबांनीं पाठवलं.'

'हं हं, ठीक आहे.'

'आणि बाईसाहेबांनीं हेंही पण दिलं आहे.'

असें म्हणून संध्येच्या ड्रायव्हरनें एक जाड पाकीट प्रतापला दिलें त्यांत पांचशेंच्या चिल्लर नोटा होत्या. प्रतापनें त्यांत बरेंच शोधलें परंतु सोबत चिठी वगैरे आढळली नाहीं.

त्या दिवशीं रात्रीं प्रताप ज्यावेळीं संध्येकडे गेला त्यावेळीं प्रताप नेहमीपेक्षां अधिक अस्वस्थ झाला असावा असें संध्येला वाटलें.

जेवण झाल्यानंतर प्रतापनें टॉवेलनें हात व तोंड पुसले. मग एका कोचावर संथपणानं सिगारेट ओढत बसला. त्याच्याजवळच संध्याही पण बसली.

संध्येनें त्याला दिलेलें नोटाचें पाकीट प्रतापनें काढलें व तें संध्येला परत देत म्हणाला,

' वहिनी राग मानूं नका हं. '

तेव्हां त्याला मुळीसुद्धां स्पर्श न करतां दचकून संध्या म्हणाली.

' म्हणजे प्रताप याचा अर्थ काय ?'

' मला नकोत पैसे. '

' म्हणजे पैशाची तुम्हाला जरूर नाहीं म्हणतां प्रताप. '

' खोटं कशाला सांगू वहिनी तुम्हांला. परंतु तुमच्याकडून मदतीचा स्वीकार करतांना मला बरं वाटत नाहीं. माझ्यासाठीं माझा मलाच पैसा मिळवतां आला पाहिजे, तुमच्या दयेवर मी जगूं लागलों तर हें माझं जीवित जपानी बत्तीप्रमाणं कधीं अन् कसं अकालीं जळून जाईल तें सांगतां येत नाहीं.'

' परंतु माझ्यासाठीं...माझ्यासाठीं...'

संध्येच्यानें पुढें बोलवलें गेलें नाहीं. तिचा घसा दाटून आला व तिच्या डोळ्यांतून अश्रूधारा सळसळून बाहेर आल्या.

हुंदके देऊन संध्या रडूं लागली.

प्रतापचें मन मोठें बावरून गेलें. त्याक्षणीं त्याला त्याच्या जिवलग स्नेह्याची-उल्हासची-आठवण झाली. त्याच्या हृदयांत खोल दडलेल्या मातेच्या प्रेमळ स्मृती जाग्या झाल्या. माणिकरावांचें त्याच्यावरील निःसीम प्रेम त्याला अगदीं ताजेपणानें आठवलें. त्याला या उघड्या जगावर सोडून गेलेले त्याच्या जिवाचे जिवलग आठवून आपण एकटे आहोंत ह्याचा तीव्र विषाद प्रतापला वाटला.

संध्येच्या मांडीवर त्यानें आपलें मस्तक टेकवलें नी कधीं नव्हे इतक्या विलक्षण भावनावशतेनं तोही रडूं लागला.

# ८

# मिस् आशाराणी स्मार्ट--

अज्ञ हिंदु जनतेबद्दल भूतदयेनें प्रेरित होऊन अलम हिंदुस्थानांत ज्या निरनिराळ्या ख्रिश्चन संस्था स्थापण्यांत आल्या त्यांपैकीं........मिशननें मुंबईला चालवलेलें मुलींचें हायस्कूल म्हणतां येईल. ही संस्था स्थापन करण्यांत चालकांचे कोणते हेतू असतील ते असोत परंतु नमुनेदारपणें चाललेल्या ज्या तुरळक संस्था हिंदुस्थानांत आहेत त्यांपैकीं ह्या संस्थेला पहिल्या रांगेंत स्थान मिळण्यासारखें होतें. उच्च शिक्षणपद्धती, चोख शिस्त, शाळेंतील अनेक छोट्या मोठ्या पोटसंस्था, मुलींना आवडणारे व्यायामाचे हलकेसे प्रकार, मनरंजन व शिक्षण जोडीजोडीनं साधणारी बहुविध साधनें ह्यानें हें हायस्कूल मुलींना अत्यंत आवडतें झालें होतें. इतकेंच नव्हे तर,... ..मिशनच्या ह्या हायस्कुलांत न शिकणें ही गोष्ट आपल्याला कमीपणा आणणारी आहे असा ह्याडून सगळ्या श्रीमंत मुलींत समज होता.

सदर शाळेच्या वाढत्या लोकप्रियतेचें सगळें श्रेय कुणीही त्या शाळेची कर्तबगार प्रिन्सीपॉल मिस् आशा स्मार्ट ह्यांनाच दिलें असतें. अविश्रांत श्रम, कलापूर्ण टापटिप ह्यानें त्यांचें स्वतःचें, त्या हायस्कूलचें, इतकेंच नव्हे तर ज्या

संस्थेच्या विद्यमानें तें हायस्कूल चालत होतें त्या संस्थेचेंही नांव आख्या मुंबईत उज्वल केलें होतें.

मिस् आशा ही मोठी कर्तबगार चालिका होती. ह्याबद्दल कुणाचाही मत-भेद होण्यासारखा नव्हता. मतभेद झाला असता तर तो तिच्या वैयक्तिक खाजगी जीवनाबद्दल! कांहीं जणांच्या मतें तिला देखण्या पोरसवदा तरुणांबद्दल लोकविलक्षण आसक्ति वाटत होती. तिला तरुणांपेक्षां गोऱ्या सोजिरांचा विलक्षण नाद आहे असाही एक प्रवाद होता. ती विलक्षण मद्यपि असून हें तीव्र व्यसन तिच्या ऑक्सफर्ड येथें शिकत असतांना झालेल्या प्रेमभंगानें जडलें असेंही कांहीं लोक ' आंतली ' बातमी म्हणून सांगत.

सारांश तिच्या वैयक्तिक चारित्र्याबद्दल निरनिराळ्या अफवा आणि कंड्या होत्या. तरुण, देखण्या, थाटामाटांत राहणाऱ्या श्रीमंत पण अविवाहित मुलांमुलीं-बद्दल प्रवाद असणें ही कुठल्याही समाजांत एक अपरिहार्य गोष्ट आहे.

तिच्याविषयीं उठणाऱ्या सगळ्या प्रवादांबद्दल अत्यंत बेफिकीर होऊन तिला वाटेल तसें मिस् आशा आपलं आयुष्य घालवित होती.

आतांच पहाना.........

मध्यरात्र होऊन गेली होती. वाऱ्याची झुळूक मधून मधून चोर पाऊलानें आंत येत होती. क्वचित्च एखादी मोटार भर्रदिशी निघून जाई. मध्यरात्रीच्या ह्या संकेतसमयीं एकमेकांच्या कुशीच्या विसाव्यांत सगळे प्रियकर झोंपी गेले असतील.

परंतु मिस् आशा मात्र जागीच होती.

हातभर उंच अशा पराच्या गादीवर ती पडली होती. वक्षःस्थळापर्यंत तिनें आलोवान ओढून घेऊन त्यावर आपले हात दाबून धरले होते. तिच्या पलंगाजवळच्या छोट्याशा उंचट स्टुलावर विजेचा दिवा तेवत होता. त्या दिव्या-वरची हिरवी झडप ओढून घेतल्यानें मंद हिरवा प्रकाश तिच्या राजविलासी शय्येवर पसरला होता.

आशा दिसायला अगदींच कुरुप होती. वर्णानें ती सांवळी होती. पण त्या सांवळ्या रंगाचा विशेष हा होता कीं त्या रंगाचा कल काळसरपणाकडे झुकून राहिला आहे हें पाहणाऱ्याच्या ध्यानांत चट्दिशीं यावें. ती बरीच कृश दिसत

होती. तिच्या मानेजवळचीं दोन बाजूचीं आडवीं हाडें ठळकपणानें बाहेर आलेलीं दिसत. तिचे केस मूळचे तोकडे होते कीं ते कापून तिनं तसे केले होते कुणास ठाऊक! परंतु जे होते ते मोकळे सुटले तरी त्यांचा खांद्याना ओझरता स्पर्श होई इतपत होते. ते तिला वाईट दिसत. तिची हनुवटी किंचित् पुढें आल्यासारखी वाटे. विशेषतः ती बोलायला सुरुवात करी त्यावेळीं तिच्या दातांची खालची रांग व त्यांत चार दोन ठिकाणीं बसवलेलें सोनें दातांच्या वरच्या कवळीपेक्षां समोर आलेलें दिसे. तिच्याशीं प्रथम बोलणाऱ्याचें लक्ष क्षणभर तिकडे वेधलें जाई.

आशेनें मनगटावरचें घड्याळ भिंतीवरील घड्याळाशी ताडून घेतलें. अस्वस्थ होऊन तिनें आपल्या मानेखालची उशी पालथी करून त्यांवर मान टेकवली.

ती अधिक किती अस्वस्थ झाली असती कुणास ठाऊक परंतु दारावरचें बटन दाबलें गेलें नि घंटा खणखणूं लागली.

मग तिची एकच धांदल उडाली. घाईघाईनें तिनें पलंगावरून उडी मारली, पायांत सपाता अडकवल्या, आरशांत पाहून केसांवरून ब्रश फिरवला आणि सपातांचा चट्‌चट् असा आवाज करीत तिनें दार उघडलें.

'ये. ना फ्रँक.'

त्याचें नांव फ्रँक गॉर्डन! श्रीमंत बापाचीं ऐदी मुलें ज्या ऐटीनें राहतात त्याला अपवादात्मक अशी फ्रँकची राहणी नव्हती. तो अँग्लो इंडियन होता. रुंद छाती, भरदार खांदे, जास्तींत जास्त सव्वापांच फूट उंचीचा तो तरुण होता. तो वर्णानें आधीचाच गोरा होता, तशांत त्यानें टॅट्चा रंग वापरल्यानं मूळचा त्याचा गौरवर्ण आतां आरक्त झाला होता. तसेंच त्याचे केसही मूळचे काळेशार होते परंतु कसल्यातरी द्रव्याचा संस्कार करून त्यानें ते तपकिरी बनवले होते.

आंत येतांच फ्रँकनें कोट काढून खुंटीवर अडकवला, टाय ढिला केला नि फुगीर पोटावरून थोडीफार खालीं घसरलेली पँट उचलून ठाकठीक केली.

मग तो म्हणाला, 'क्षमा कर हं मला.'

'तें शक्य नाहीं' गाल फुगवून आशा म्हणाली.

‘कां बरं?’

‘एकच गुन्हा सारखा होत राहिला म्हणजे त्याला क्षमा कितीदां करायची?’

‘नेहमींच’ हंसून फ्रँक पुढें म्हणाला, ‘थट्टा नाहीं, आशा, परंतु मोठ्या नाईलाजानं मला इतका वेळ क्लबांत गप्पागोष्टी करत बसावं लागलं.’

‘गप्पागोष्टी!’

‘हो, कां बरं?’

‘गप्पागोष्टी कीं तीन पत्ते अन् दारुबाजी!’

‘रागावलीस होय! तुझ्या हातचं तेवढं मी मद्य घ्यावं अन् दुसरीकडे कुठें घेऊं नये म्हणतेस! बरं बुवा, काढ, काढ, नव्या दमानं पेले रिकामे करूं या! काढ कीं.’

बदामी आकाराचे छोटे टेबल आशेनं ओढलं नि मद्याचे उथळ पेले कांठोकांठ भरले.

लागोपाठ तीन पेले रिकामे केल्यानंतर आशा उल्हासित झाली.

फ्रँकला तिनें विचारलें,

‘तुला आवडलं हें मद्य?’

‘हो, हो. तुझ्या हातचं कोणतही मद्य मला नेहमींच आवडतं.’

आशेनें फ्रँककडे पाहिलें नि मोकळें हास्य केलं

मग फ्रँकच्या खुर्चीच्या रुंद हातावर बसून नि फ्रँकच्या शर्टच्या गुंडीशी चाळा करत आशा म्हणाली,

‘फ्रँक...........

‘काय?’

‘एक विचारूं तुला?’

‘हं.’

‘माझ्याशी केव्हां करणार तूं लग्न?’

‘वाटलंच मला ...........’

‘काय?’

‘पुरुषांच्या आदरातिथ्यांत स्त्रीनं उणं पडूं दिलं नाहीं म्हणजे तिचा भयंकर स्वार्थ कुठंतरं घोटाळत असतो हें निश्चित.’

'म्हणजे!.........लग्न करणं हा स्वार्थ समजतोस तूं?'

'अलबत्. आशा, तुला कबूल करावं लागेलच कीं तुझ्यावर प्रीति करतांना मी कधींहि लग्नाची गोष्ट काढली नाहीं............'

'कशी काढशील तूं. तुला लग्न ही आवश्यक बाब आहे असं कसं वाटेल?'

'......अन् तुला केव्हांपासून वाटूं लागली......'

'फ्रँक......

आशा किती जोरानें किंचाळली!

तिचे डोळे रागानें लाल झाले. तिचा संताप अनावर झाल्यानें किंवा काय परंतु तिच्या ब्लाउझची वरची गुंडी सुटली नि कंचुकीविहीन तिचें सांवळें वक्षःस्थल, फँकला दिसूं लागलें.

'फ्रँक, याचा, सोक्षमोक्ष एकदां लावायचा होता मला. बोल, तूं माझ्याशीं लग्न करणार कीं नाहीं?'

'नाहीं! नाहीं!! नाहीं!!! तीनदां नाहीं. मी दरवेळीं तुला हेंच सांगत आलों. तुमच्या नाहींचा अर्थ हो असा होत असेल एकवेळ, परंतु पुरुषांचा नाहीं म्हणजे नाहीं......'

'नीच, हलकट, बदमाष.'

'हं, शिव्या देऊं नकोस, त्यांत मीं मागें पडेन असं समजतेस काय तूं?'

'चूप. बोलूं नकोस. हजारो रुपये खर्च केले मी तुझ्यासाठीं फ्रँक. निदान ते तरी आठव......'

'कांहीं उपकार नाहीं केलेस माझ्यावर. तुझ्यासारख्या कुरूप, पुरुषी नि थोराड पोरीवर प्रेम करायला मेहनताना मिळणें जरूर आहे.'

'कुरूप, मी कुरूप.........फ्रँक.........'

फ्रँक घाबरला.

आशा विलक्षण जोरानें ओरडली. ती काय करील नि काय नाहीं याचा भरंवसा फ्रँकला वाटला नाहीं. म्हणून त्यानें खुंटीवरचा कोट घेतला व जातां जातां तो म्हणाला,

'कुरूप नाहीं तर काय? तुझ्या सगळ्या आरशांना विचार. तेच तुला सांगतील. तुझ्याशीं लग्न करणारा सैतानच म्हटला पाहिजे.'

त्यानंतर त्वरेनें फ्रँक निघून गेला.

कितीतरी वेळ फ्रँक गेला तिकडे आशा पाहत राहिली. ती पूर्णपणें सुंद होऊन गेली. त्या खोलीतील वस्तू न् वस्तू ओरडून फ्रँकच्या शब्दांत तिला सांगताहेत असा भास झाला, ......'कुरूप नाहीं तर काय? कुरूप, कुरूप...'

तिनें आपले कान दाबले. अंतःकरणांतल्या केवढ्या नाजूक भागावर प्रहार करून फ्रँक चालता झाला होता. पहिल्या प्रेमभंगानंतर मुद्दामहूनच तिनें आपलें लग्न लांबणीवर टाकलें होतें. त्यानंतर तिच्यावर प्रेम करणाऱ्या तीनचार तरुणांनीं तिच्यावर उत्कट प्रेम केलें होतें. त्यांनीं लग्नाची गोष्ट काढली नाहीं म्हणून काय झालें? परंतु त्यांनी प्रेम केलें तें किती उत्कट होतें!

एकाएकीं आशा शंकेनें व्याकुल झाली. त्यांनीं तिच्याशीं लग्नाची गोष्ट काढली नाही ह्याचें कारण ती कुरूप होती हें तर नव्हेना......

आशेचे डोळे आसवांनीं भरून गेले. ती रडूं लागली.

......कुरूप! कुरूप!! आपण कुरूप!!!

त्यानंतर आशा झोंपली हें खरें! परंतु एखाद्या चेटकिणीनें आपले मंत्र पुटपुटत रात्रभर आपली भेसूर साधना करत राहावी त्याप्रमाणें हा एवढा एकच विचार तिला रात्रभर भेडसावत होता. मोठी बेचैन होऊन ती झोंपली.

दुसरे दिवशीं आशा सकाळीं शाळेंत गेली. त्यावेळीं अपुऱ्या झोंपेची रात्र गेल्यानें तिचे डोळे कांहींसे लालसर नि उदास दिसत. सकाळीं आपल्या नेहमीच्या पद्धतीनें केशभूषा न केल्याने तुरळक केस लोखंडी तारेप्रमाणें क्वचित् कांहीं ठिकाणीं ताठरपणें उभे झाले.

ती आपल्या ऑफिसमध्यें काम करत असतां तिच्या हाताखालीं काम करणारी एक शिक्षकीण तिच्या समोरच्या खुर्चीवर येऊन बसली.

तिचें नांव लतिका जयवंत!

'हं काय लतिकाबाई?'

'एक काम होतं.'

' हं, बोलां ना!'

' मी नोकरी सोडणार आहे उद्यापासनं. '

' उद्यापासनं!' आश्चर्यानें स्तंभित होऊन आशा म्हणाली.

' म्हणजे, कांहीं त्रास होतो तुम्हांला इथं......

' छे, छे, त्रास अन तुमच्या हाताखालीं. परंतु, परंतु......'

लतिका लाजली. त्याचें कारण न ओळखून आशा म्हणाली,

' काय तें स्पष्ट सांगा ना. '

' माझं लग्न ठरलंय्. लग्नानंतर मी हा व्यवसाय केला असता मोठ्या आनंदानं. परंतु ते तिकडं मद्रासला आहेत कस्टम्समध्यें. '

लतिकेनें रुमालानें मान व कपाळ टिपलें.

' कॉंग्रॅच्युलेशन्स! आनंदाची बातमी सांगितलीत तुम्ही मला. '

' वास्तविक आपल्या संस्थेच्या नियमाप्रमाणें एक महिन्याची नोटीस द्यायला हवी होती मी, पण त्याला आतां वेळ नाहीं. अन् वेळ लागलेला त्यांना खपायचा नाहीं.'

' असं, असं. ते सगळं मी ठीक करून घेईन. मग तुम्ही उद्यां संध्याकाळीं माझ्याकडे या ना जेवायला. पुन्हा एकवार मी अभिनंदन करतें तुमचं. '

लतिकेच्या निर्व्यंग, सुडौल व सौंदर्यानें मुसमुसलेल्या शरिराकडे एकवेळ मिस् आशेनें पाहिलें, तिच्याशीं हस्तांदोलन करून मोठ्या प्रेमानें तिला निरोप दिला.

ती घटना मोठी परिणामकारक होती. तिनं लतिकेची स्वतःशीं तुलना केली. मग तिला वाटलें लतिकेचें लग्न होतें तें बरोबरच आहे. तिच्यासारख्या सुंदर मुलीचं लग्न झालें त्यांत विशेष असं काय आहे? तिच्यासारख्या सुंदर मुलीचें लग्न व्हायचें नाहीं तर मग काय आपल्यासारख्या......कुरूप!!!

आशेनें घंटा वाजवून चपराशाला बोलावलें नि सांगितलें,

' हें पहा, मी आतां घरी जातें, ड्रायव्हर कुठं असेल तर पहा. आणि हें पहा कारकुनाला पाठवून दे. आणखी हें बघ......पण जा तूं. '

तिचा म्हातारा कारकून आल्यानंतर मिस् आशा म्हणाली,

' हें पहा, लतिका जयवंत राजिनामा देते आहे, तिच्या जागीं आपल्याला कुणाला तरी नेमलं हें पाहिजेच. तर त्यासाठीं झाडून सगळ्या इंग्रजी, मराठी, गुजराथी, उर्दु पत्रांतून जाहिराती देऊन टाका. अन् दुसरं असं कीं मी आतां जातें, बरं नाहीं मला, माझी डाक आली तर चपराशाबरोबर पाठवून द्या. '

म्हातारा कारकून विस्मयानें पाहतच राहिला.

त्याच्या नि पट्टेवाल्याच्या मतानें त्यांची प्रिंसीपॉल यापूर्वी इतकी बेचैन कधींच झाली नव्हती.

१

# एकवटलेलें मनस्ताप--

धैर्यानें व शांतपणानें परिस्थितीचा विचार करणाऱ्या माणसाला प्रतिकूल परिस्थितीची धार तितकीशी बोंचत नाहीं. अन् कायमची तर ती कधींच बोंचत राहत नाहीं. या आयुष्यांत सुखाबरोबर दुःख आहे, सुखविलासाबरोबर दारिद्र्य आहे, प्रकाशाबरोबर अंधःकार आहे नि फुलाबरोबर कांटे आहेत हें कुणाला माहिती नाहीं ? साधारण विचारी इसमाला हें समजल्याविना राहत नाहीं. आणि हें एकदां त्याला समजलें असलें म्हणजे आपत्काळीं तो मोठ्या धीरानें वागण्याचा प्रयत्न करत असतो.

परंतु सामान्यपणें लहान मोठ्या विपत्कालीं मनुष्य मोठा धीर, गंभीर नि मुळींसुद्धां विचलीत न होतां वागत असतांना कित्येक प्रसंग असे येतात कीं तो त्यावेळीं आपली मनःशांती नि मनोधैर्य गमावून बसतो. अशा प्रसंगीं त्याचा मनःस्ताप मोठा तीव्र होऊन त्याच्या जीवनांतला सगळा फुलोर गळून पडतो. बाजूच्या इमारतीच्या खिडक्यांतून प्रकाशाचे स्रोत दिसून वाटचालीचा रस्ता तेवढा मात्र दाट काळोखांतून जावा त्याप्रमाणें त्याला जुन्या प्रकाशित आठवणी तेवढ्या आठवतात. अन् पुढचा जीवितमार्ग विलक्षण भयाण दिसूं लागतो.

प्रतापचें असेंच झालें.

आपल्या जीवितांत सौख्याची ज्योत्स्ना तुडुंब भरली आहे असें त्याला कधींच वाटलें नाहीं. आयुष्यांत अनंत दुःखें आहेत ह्याची त्याला जाणीव होती अन् ह्या सगळया प्रसंगांना तोंड देतांना तो आपलें मनःस्थैर्य शक्य तितकं ढळू देत नसे. दुःखाची त्याला स्पष्ट जाणीव होती अन् आतांशा तर ज्याला साधारण लोक सुख म्हणतात तें एक दुःखाचंच दर्शन आहे हेंही त्याला समजलें होतें. इतकेंही होतें तरी ज्या गांवांत, ज्या लोकांत नि ज्या समाजांत तो ऐटीनें, स्वाभिमानानें राहिला होता तेथेंच आपण ढोंगी दयेचा नि उथळ सहानुभूतीचा विषय होऊन जावें हें त्याला पटलें नाहीं. ही मानभंगाची आपत्ती त्याला पूर्णपणें असह्य वाटली.

होय! त्याच्यावर ओढवलेली आपत्ति मानभंगाची नव्हती तर कसची? संध्येसारख्या त्याच्या आवडत्या वहिनीनें त्याला मदत करावी, नि ती मदत स्वीकारत अत्यंत लाजिरवाण्या लाचारीचें, कर्मशून्य, विळविळीत आयुष्य कंठण्याचा प्रसंग प्रतापसारख्या मानी तरुणावर येणें ही घटना मोठी करुणास्पद होती.

त्यावर नक्की उपाय कोणता हें प्रतापला सुचलें नाहीं हे खरें! परंतु संध्येपासून दूर जावेंसें त्याला वाटलें. माणसाच्या आयुष्यांत असे कांहीं प्रसंग येतात कीं ज्यावेळीं त्याचे अश्रू अनावर होतात आणि हुंदके ओठाशीं गर्दी करतात. परंतु त्याचवेळीं त्याला हेंही वाटत असतें कीं आपले हुंदके कुणीही ऐकूं नये, गालावरून ओघळणारे अश्रू टिपण्यासाठीं कुणाचेही ओठ थरथरूं नयेत.

म्हणूनच प्रतापनें दूर जाण्याचं निश्चित ठरवलें.

एक दिवस त्याला तसें कारण मिळालें.

सकाळीं जेवण आटोपल्यानंतर तो संध्येला म्हणाला,

'वहिनी.'

'काय?'

'आज मेलनं मुंबईला जायचा विचार आहे माझा.'

'कां बरं? कां कांहीं विशेष काम?'

'आपले जस्टिस सरदेशपांडे आहेत ना............'

'हं.'

‘ त्यांच्या मेव्हणीचं लग्न आहे. माझ्या एका स्नेह्याला दिली आहे.’

‘ असं ! मग परत येणार केव्हां ? ’

‘ परवां येईन मेलनं.’

‘ ठीक आहे. मग तुम्हांला कांहीं........... ’

‘ नको, नको सगळी व्यवस्था आहे.’

संध्येनें प्रतापकडे पाहिलें. तिच्याकडून पैशाची कोणतीच मदत स्वीकारायची नाहीं हें त्यानें नक्की ठरवलेलें दिसत होतें.

त्याचा तिला मोठा खेद झाला.

प्रतापला मनांतून वाईट वाटलें नाहीं असें थोडेंच आहे. परंतु त्याला त्याचा इलाज नव्हता. संध्येला थाप मारून तिच्यापासून असें दूर सटकणें जरी त्याला शोभत नव्हतें तरी तें त्यावेळीं आवश्यक होतें. पतिनिधनाचें दुःख अकालीं गिळण्याचा प्रयत्न करणाऱ्या संध्येसारख्या निष्पाप मुलीला पुन्हा आपल्या डोळ्यांदेखत दुर्दैवानें दंश केलेला पाह्यचा हें चांगलें नव्हतें खरें ! परंतु त्याला इलाज नव्हता. शिवाय प्रतापला असें वाटलें कीं संध्येला ही थाप मारावयाची नाहीं तर तिला काय सांगायचें कीं आपण एका नोकरीसाठीं खटपट करायला म्हणून मुंबईला जात आहोंत !

प्रतापनें आतांपर्यंत कधींच नोकरी केली नव्हती. उलट हाताखालीं नोकर वागवले होते. त्याचे पुष्कळसे स्नेही नोकर होते. त्यांपैकीं कित्येक प्रोफेसर, शिक्षक, सबजज्ज, एक्स्ट्रा असिस्टंट कमिश्नर व सेक्रेटरीएटमधील कारकून होते. परंतु त्या सगळ्यांचें आयुष्य त्याला राज्याच्या भल्यामोठ्या यंत्रांत सांपडून केविलवाणं झालेलें दिसत होतें. त्यांतील हालअपेष्टांची, लाचारीची प्रतापला दुरून कल्पना होती. आणि आतां तर त्या दुर्गंधींत त्याला स्वतःला रहावयाचें होतें.

प्रतापला त्यानें मोठा खेद झाला.

मेलमध्यें येऊन बसल्यानंतर त्यानें हमालाकडून आपलें होल्डऑल पसरून घतलें. कोट काढून उशीखालीं ठेवला आणि पाठीमागें उशा घेऊन सिगारेट ओढत खिडकींतून बाहेर पाहण्यास सुरुवात केली.

तो असा बाहेर किती वेळ पाहत राहिला असता कुणास ठाऊक !

कारण डब्यांत दिवे लागले. लखलखीत सूर्यबिंब क्षितीजावर टेकून त्या खालींही निघून जाऊन दृष्टीआड झालें. क्षितीजांतून अंधःकार सावकाश उतरूं लागला. अनेक पक्षीकुळें एका क्षितीजांतून निघून दुसऱ्या क्षितीजांत विलीन झालीं. चांदण्या हळूहळू डोकावूं लागल्या. झोंबणारा गार वारा सुटला आणि पृथ्वीवर काळोखाचे काजळी थर इतके जमा झालेत कीं झपाट्यानें निघून जाणारीं झाडें नि तारायंत्राच्या तारेचे चढउतार त्यांत दिसेनासे झाले.

बडनेरा आला.

प्रतापने छातीशीं धरलेला टाईम्स एकदां नीट केला. ज्या नोकरीच्या निमित्तानें तो नागपूर कायमचं सोडणार हातां, त्या नोकरीची जाहिरात त्यानें त्यांतच वाचली होती. तें वर्तमानपत्र पेटींत ठेऊन देण्यापूर्वीं एकदां ती जाहिरात वाचून घ्यावी असें प्रतापला वाटलें. परंतु त्याला तें शक्य झालं नाहीं. Wanted च्या खालीं त्याची हट्टी दृष्टि कांहीं केल्या वळेना.

मग प्रतापनें वर्तमानपत्र पेटींत ठेऊन दिलें आणि पाय मोकळे करण्यासाठीं तो प्लॅटफॉर्मवर उतरला.

तो प्लॅटफॉर्मवर उतरला खरा. परंतु तेथील गोंगाट नि गर्दी त्याला आवडली नाहीं. आपापले जाळीदार खोमचे सावरत विशिष्ट लांबट उच्चार करत खोमचेवाले जात येत होते. कळकटलेलीं दोनचार पोरें इस्लामी आणि हिंदू 'चाय' ओरडत होतीं. वरच्या वर्गाच्या उतारूंना जेवण पोंचवण्यासाठीं पांढऱ्या शुभ्र कपड्यांत काळेसावळे वेटर मोठ्या धांदलीनें इकडे तिकडे जात. परंतु त्यांच्या परिटघडी कपड्यानें त्यांचे तेलकट तकतकीत केस व तसाच त्यांचा रंग खुलून उठायला अधिक मदत होई.

प्रताप आंत जाऊन बसला व त्याने सिगारेट शिलगावली.

तो असा आंत येऊन बसल्यानंतर त्याला कुणी तरी विचारलें,

'साहेब —'

'हं.'

'जेवण आणूं?'

'आण कीं एक ताट.'

'हिंदू...'

'हं...'

अकोल्याच्या स्टेशनवर जेवणाच्या ठेकेदारानें प्रतापसाठीं जेवणाचें ताट पाठवलें. परंतु प्रतापला जेवावेंसें वाटलें नाहीं. जेवण घ्यायची ती वेळ होती म्हणून प्रतापनें ताट मागवलें हें खरें असलें तरी त्याला मुळीसुद्धां भूक नव्हती. जगतांना मनुष्याला अन्नाची जरूरी वाटते. परंतु त्याचें आयुष्य सपलें होतें तें अशा अर्थानें कीं त्याच्या ज्या वेगळ्या आयुष्याला आतां सुरुवात होणार होती ती त्याच्या जुन्या आयुष्याच्या मृत्यूंतूनच नाहीं कां ?

या विचारानें प्रताप अधिकच गंभीर झाला.

पुढच्या स्टेशनवर जेव्हां जेवणाचा ठेकेदार ताट घ्यायला आला त्यावेळीं साहेब धूम्रपान करत होते. अन्न उष्टावलें नव्हतें. म्हणून तो मोठ्या आदबीनें म्हणाला,

'साहेब.'

'हं घेऊन जा ताट. आज मला जेवायचं नाहीं, हें विसरलोंच मी. हं तुझं बिल.'

त्यानंतर ठेकेदारानें ताट उचललें. परंतु त्यानें प्लॅटफॉर्मवर उतरल्यानंतर साहेबाकडे पुन्हा एकदां निरखून पाहून घेतलें.

गाडी अगदीं ऐन वेगानें चालली होती. अकरा वाजून गेले. डब्याच्या खिडक्यांचीं तावदानें ओढून घेतल्यानें वाऱ्याचा म्हणण्यासारखा त्रास होत नव्हता. डबा हालत नव्हता. थोडक्यांत म्हणजे झोंप घ्यायला ती मोठी प्रसन्न वेळ होती.

प्रताप पडला व कानापर्यंत त्यानें रग ओढून घेतला.

तो कितीतरी वेळ असाच पडून राहिला. एखाद्या दुखणाइताच्या जवळ जवळ निद्रेनें घोटाळून त्याच्या हातीं मात्र ती लागूं नये त्याप्रमाणें आपलीही आज स्थिति होत आहे हें प्रतापला समजून चुकलें. आपल्या सगळया सुखाबरोबर अत्यंत महत्त्वाच्या दोन गोष्टी म्हणजे भूक व झोंप याही आपल्याला कायमच्या सोडून जाणार कीं काय ह्या शंकेनें व्यथित होऊन त्या राजबिंड्या तरुणाचे डोळे अश्रूंनीं भरून आले.

*                    *                    *

ज्यावेळीं मुंबईकडे येणाऱ्या मेलमध्यें आपल्या इतके दुर्दैवी आपणच ह्या कल्पनेनें प्रतापचे डोळे आसवांनीं भरून आले त्याचवेळीं ह्या कल्पनेनें व्याकूळ

होऊन मिस् आशा आपल्या खोलींत रडत होती. अश्रूनीं ओल्याचिंब झालेल्या उशींत आपलें मस्तक लपवून ती हुंदके देत होती. त्यावेळीं तिनें आपल्या खोलींतले सगळे दिवे मालवले होते. जणूं काय भिंतींवर टांगलेल्या तसबिरींतील तिच्या प्रियजनांनासुद्धां आपलें केविलवाणें रडें तिला दिसूं द्यावयाचें नव्हतें.

आशेला वाटलें, आपल्या इतकें दुर्दैवी दुसरं कुणीही नसेल!

तिने जवळच्या टेबलावरील दिवा उजळला आणि तेथंच पडलेलं पाकीट उचललें. त्यांतील आमंत्रणपत्रिका न वाचतां तिनं त्या सोबतचें पत्र वाचलें.

......सोबत माझ्या लग्नाची आमंत्रण पत्रिका आहे. त्यारात्रीं तुझं माझें भांडण झाल्यानंतर तुला मी भेटलों नाहीं. परंतु खरं सांगायचें तर तुझी मला भीति वाटूं लागली आहे. ह्याचा भलताच अर्थ घेऊं नकोस हो!

मी ज्या मुलीशीं लग्न करणार आहे ती मोठी गोड नि छटेल छोकरी आहे. इथंच एका फर्ममध्यें ती टायपिस्ट आहे. वेतासारखी लचक, रंग गोरागोरा पान, मानेपर्यंत आंखूड केंस आणि तिचे लाल चुटुक ओठ छे, छे अशी छडीदार सुंदर मुलगी या जन्मांत तरी पाहिल्याचं मला आठवत नाहीं.......

आशेच्यानें तें पत्र वाचवलें गेलें नाहीं. तिनें तें पत्र व फ्रँकच्या लग्नाची पत्रिका फाडून टाकली. पुन्हा तिनें एकवार रडायला सुरुवात केली. फ्रँकनें तिच्या कुरूपपणावर आडून वार केला. पण त्याची जखम तिच्या जिव्हारीं पोंचली.

बराच वेळ रडल्यानंतर ती उठली, तोंड धुतलें आणि केंस व्यवस्थित केले. दिवा मालवून ती निजण्याच्या प्रयत्नांत लागली.

सकाळीं उठल्यानंतर आधले रात्रीं किती वाजतां आपल्याला झोंप आली हें तिला नक्की आठवेना. मात्र हें तिला आठवलें कीं बराच वेळ आपण उशांची वरखाल करत होतों, चारचारदां अंगावरची चादर पायाशीं फेंकून देत होतों आणि कपाळावर नि वक्षःस्थलावर हात दाबून धरत होतों. तिला हेंही आठवलं कीं ज्यावेळीं आपल्याला झोंप आली त्याच्या आधींच बाह्यसृष्टींत गडबड होऊं लागली खरी, परंतु आपली मनसृष्टी मात्र हळूंहळूं शांत झाली. ज्या विचारानें

लहानशा चिटोऱ्यावर आपला पत्ता लिहून देऊन आशा म्हणाली,

'हा माझा पत्ता'

तो चिटोरा त्यानें खिशांत ठेवला.

'किती आभार मानूं मी तुमचें!'

'छे, छे आभार कसचे! हें सगळं संस्थेची इभ्रत वाढविण्यासाठीं करायचं असतं.'

'तरीपण आपली माझी ओळख नसतां किती आपलेपणा दाखवलांत तुम्ही मला.'

'छे, छे तसं म्हणूं नका मि. प्रताप! जगांत चांगुलपणा कधींच लपत नाहीं......'

'हो, हो ते तर खरंच आहे. त्याच्याशिवाय कां तुम्ही मला मदत करताहांत.'

आपले बोलणे आपल्यावरच मोठ्या चातुर्यानें उलटवलं त्यानें आशेला हंसायला आलें.

लवकरच प्रताप तेथून गेला.

कां, तें तिचें तिलाच समजेना परंतु आशेनें समितीच्या अध्यक्षाकडे शब्द टाकला. आणि तिच्या शब्दाला योग्य मान मिळालाही.

लवकरच प्रताप त्या संस्थेंत दाखल झाला.

# १०

# दया आणि आशा

आशेच्या शाळेंत प्रताप दाखल झाला, आणि त्यानें तेथें मनापासून काम करण्यास सुरवात केली. लवकरच एक कळकळीचा शिक्षक म्हणून तो तेथील मुलींत प्रिय झाला. प्रत्येक तासासाठीं प्रताप तयारी करून जाई. तशा तयारीनें तो शिकवायला उभा राहिला, म्हणजे त्याच्या वर्गांतील झाडून सगळ्या मुलींना तो बोलत असतां त्याच्या तोंडून बाहेर येणाऱ्या शद्बांकडे अधिक लक्ष द्यावें किंवा त्याच्या सुंदर व किंचित् भपक्याच्या वेषभूषेकडे नी त्याच्या सुरम्य आकृती-कडे लक्ष द्यावें हें न समजल्यानें त्या गोंधळून जात. मग त्यांच्यापैकीं लाजऱ्या मुली अधोवदन करून खालीं पाहूं लागत. त्यांच्यापैकीं अधिक धीट मुली त्याच्याकडे जास्त धिटाईनें पाहूं लागत.

ही मनःस्थिती त्या अजाण व यौवनाच्या अनोळखी प्रदेशांत पदार्पण केलेल्या तरुण मुलींची झाली यांत विशेष असें कांहींच नव्हतें. परंतु आशे-सारख्या मुरलेल्या, अनुभवी स्त्रीचाही प्रतापसमोर असा गोंधळ उडूं लागला. प्रताप नजरेसमोर असतांना तिला आपलें आयुष्य अपुरें आहे असें तीव्रतेनें वाटूं

लागे. त्याचा शब्दन् शब्द कानांतून खूप खोल कुठें तरी जाऊन उतरे. आणि ती जेव्हां जेव्हां एकटी व विनाकाम अशी बसे त्यावेळीं प्रतापची यौवनानें मुसमुसलेली रम्य आकृति तिच्या डोळ्यांसमोर उभी राही.

प्रतापला हें समजलें होतें. आशेला आपण आवडतो हें प्रतापला कळून चुकलें होतें. परंतु त्या बाबतींत आपण कसे वागावें हें मात्र त्याला समजेना. आशेच्या सगळ्या वर्तणुकीची त्यानें मनाशी उजळणी केली आणि तिच्याशीं वागतांना थोडेफार जपून वागायचें एवढंच त्यानें ठरवलें. बस्स! बाकीच्या गोष्टी त्यानें भविष्यकालाच्या हातीं सोपवून दिल्या.

मनुष्याचें मन किती चमत्कारिक असतं! दुर्दैवाचा चटका बसताच भोंवतालचे विश्रांतीचे सगळे शिलाखंड त्याला रसरशीत निखाऱ्याप्रमाणें भासूं लागतात. पहिला फटकारा बसतांच दुनियेच्या कोपऱ्याकोपऱ्यांतून आपले डोळे वटारून दुर्दैव त्याच्याकडे पाहतांना त्याला दिसूं लागतें. मग त्यानें तो विलक्षण भयाकुल होतो.

प्रतापचें असेंच झालें. म्हणून त्यानें पुढचें पाऊल टाकण्यापूर्वी जागा फुकून घेण्याची खबरदारी घेण्यास सुरुवात केली.

तो नोव्हेंबरचा महिना होता.

एके दिवशीं त्याला तास नव्हता. प्रिंसीपालकडून त्याला बोलावणें आलें. प्रिंसीपालच्या खाजगी खोलींत जाऊन खुर्चीवर बसल्यावर आशा त्याला म्हणाली,

'काय, कांही विशेष महत्वाच्या कामांत नव्हतात ना?'

'छे. छे......'

'मग जरा आपण चहा घेऊं या'

'चहा . . '

'कां? नको असेल तर लेमन स्क्वॅश मागवूं. चपराशी..... '

'जी...' चपरासी त्वरेनें आंत आला.

'ए देखो दो लेमन स्क्वॅश और–तुम्हीं सिगारेट ओढतांना प्रताप?' प्रतापला तिनें विचारलें.

'हं.'

'......ऑर सिगारट.'

'जी.'

लवकरच पेले आलेत. पेय सावकाश पीत पीत आशा म्हणाली,

'आज संध्याकाळी आठ वाजतां माझ्याकडे जेवायला या तुम्ही.'

'आज संध्याकाळी !'

'होय, आज संध्याकाळी. माझा वाढदिवस आहे आज.'

'ठीक आहे. येईन मी.'

'साडेसाताच्या सुमाराला गाडी पाठवीन मी.'

'छे, हे गाडीची कांही जरूर वाटत नाही मला.'

'तुम्हाला नसेल. परंतु मला वाटते ना.'

'मग माझं कांहीच म्हणणं नाही.'

प्रताप व आशा दोघेही त्यावर हंसले.

थोड्या वेळानें प्रताप निघून गेला.

त्या दिवशी संध्याकाळी जेवायला जातांना प्रताप आपला पोषाख करूं लागला.

त्याचा पोषाख झाल्यानंतर त्याला फार वेळ तिष्ठत बसावे लागले नाही मिस आशेची छोटेखानी ऑस्टीन गाडी आली

.... आपण केले ते चांगले की वाईट !

प्रतापजवळ एक सुंदर व भारीपैकी हिऱ्याची आंगठी होती. प्रथम त्याला वाटले की आशेच्या वाढदिवसानिमित्त आपण तिला नजर केली तर ते कांही वाईट होणार नाही. परंतु लगेच त्याला वाटले नको ! आपल्या ह्या देणगीचा तिने भलता अर्थ केला तर ! तरुणाकडून येणाऱ्या देणग्या एका विशिष्ट अर्थानेच येत असतात अशी त्यांही तरुण मुलींची समजूत असली तर !

नको ! म्हणून तो विचार त्याने रहित केला होता.

आणि आता प्रतापला समजेना की आपण केले ते चांगले की वाईट !

गाडी थांबवून ड्रायव्हरनें दार उघडलें तेव्हां प्रताप आपल्या विचारांतून जागा झाला. त्यानें खालीं उतरून मनगटावरच्या घड्याळाकडे पाहिलें. घड्याळांत आठ वाजायला पांच मिनिटांचा अवकाश होता.

जिना चढून प्रताप वर गेला

दारावर सोडलेला मद्य-रंगी पडदा बाजूला करून त्यानें आंत पाहिलें.

आशेच्या त्या प्रशस्त व आंग्लपद्धतीनें नटवलेल्या दिवाणखान्यांत प्रकाशगंगा दुथडी वाहत होती. जमिनीवर जाड भुरकट रंगाची सतरंजी होती. त्याच रंगाचें कापड लावलेलें पांचसात रुंद कोच व पांचसात खोल खुर्च्या तेथें होत्या. खिडक्यांदरवाज्यांवर मद्यरंगी रेशमी पडदे सोडले होते. कोपऱ्यांत एका जाळीदार स्टँडवर रेडिओ गात होता. उरलेल्या तीन कोपऱ्यांत तसल्याच जाळीदार स्टँडवर अर्धनग्न पुतळे होते. भिंतीवर फोटो असे नव्हतेच. सगळीं होतीं तीं तैलचित्रें! आणि त्यांतही क्रुसावर टांगलेल्या जिझस ख्रिस्ताचें चित्र विशेष डोळ्यांत भरण्यासारखें होतें.

प्रतापनें मग दिवाणखान्यांत जमलेल्या मंडळींकडे पाहिलें.

रेडिओवर कुणीतरी मुलगी कार्यक्रम घेत होती. ती पाठमोरी नसली तरी तिचा सगळा चेहेराही दिसत नव्हता. मानेवरून जरा खालीं पाठीवर ओघळलेला अंबाडा, केसांत नाजुक पानासह खोवलेली पिवळ्या गुलाबाची कळी, उजव्या कानावरची केसांची कमानदार रेखा, त्याखालील कानाचा लालवट चापा, तेथें चमकणारी हिऱ्याची कुडी व उजवा फुगीर गाल तेवढाच तेथून दिसत होता.

परंतु तेवढ्यावरून प्रतापनें तिला ओळखलें व तेथून आश्चर्यानें तो ओरडला, 'दया!'

दयेलाही मोठें आश्चर्य वाटलें. दचकून तिनें मागें पाहिलें.

दाराशीं प्रताप विस्मित होऊन तिच्याकडे अतृप्त नजरेनें पाहत होता. तिनें त्याला मागें पाहिलें त्यापेक्षां तो थोडासा काळवंडून गेला होता हें खरें! परंतु त्याच्या पाणीदार नजरेचें तेज अजून होतें तसेंच कायम होतें. त्या दिवाणखान्यांत तुडुंब भरलेल्या प्रकाशाच्या लोटांतून त्याच्या सौम्य डोळ्यांत दिसून येणारी दीप्ति वेगळेपणानें उमटून दिसत आहे असें दयेला वाटलें.

तिचा आपल्या डोळ्यांवर विश्वास बसेना!

दिवाणखान्यांत बसलेल्या इतर लोकांनाही मोठें आश्चर्य वाटलें. हंसणारे व खिदळणारे शांत झाले. राख झटकण्यासाठीं ज्यांनीं आपापल्या सिगारेट रक्षापात्रांत घातल्या होत्या त्यांनीं त्या तेथून क्षणभर काढल्या नाहींत व एका चौकडींत ब्रिजचा ऐन रंगांत आलेला डाव थांबला. सगळेजण विस्मयचकित होऊन उभ्या असलेल्या प्रतापकडे पाहूं लागले. फक्त रेडिओ गात होता.

.........दिल् वो आबाद नहीं; जिसमे तेरी याद नहीं.........

दया जितकी आश्चर्यचकित झाली तितकाच तिला असा अचानक प्रताप भेटल्यानें आनंदही झाला. कारण तिनें प्रताप निघून गेल्यानंतर तो कुठें राहतो याची चौकशी दोन तिनदां कॅप्टन साहेबांजवळ केली होती. पहिल्यांदा त्यांनी उत्तर दिलें,

'तिकडं मध्यप्रांतांत कुठं जमिनदार आहे, नक्की नाहीं माहित.'

दुसऱ्यांदा त्यांनीं उत्तर दिलें,

'असेल कुठं, तुला काय करायचं?'

अन् तिसऱ्यांदा तर ते म्हणाले,

'असल्या फाजील पंचायती मला आवडत नाहींत. राहत असेल तिकडं कुठं मसणात......'

'पण पपा......'

'चूप. जास्त बोलूं नको. असले उडाणटप्पू मी ज्या क्षणाला पाहतों, त्याच्या दुसऱ्याच क्षणाला विसरतों. इतर उडाणटप्पूंत अन् याच्यांत फरक इतकाच कीं ह्याला मी विसरणार नाहीं. कारण माझ्या टाळूवर त्यानं मारलेल्या फ्लॉवरपॉटनं केलेली जखम बुजली परंतु व्रण अद्याप बुजला नाहीं......'

अर्थात् ह्यापुढें प्रतापचें नांव दयेला त्या बंगल्याच्या आवारांत उच्चारणें कठीण होऊन बसलें. चकाकणाऱ्या निळ्या सुंदर लाटा जशा समुद्रांत निर्माण होतात तशाच त्या समुद्रांत विलीनही होतात अशी तिनें आपल्या मनाची समजूत करून घेतली. आपल्या आयुष्यांत एखाद्या सुंदर व रम्य स्वप्नाप्रमाणें प्रताप

आला खरा परतु त्याच्याविषयीच्या स्नेहाच्या तिच्या सगळया कल्पनांची उतरंड जमीनदोस्त झाली.

प्रतापविषयीं म्हणाल तर, मुबई सोडल्यापासून परत मुंबईला येईपर्यंत प्रतापला दयेची अशी आठवण क्वचितच् आली होती. आणि त्याचें कारणही स्पष्ट होतें. परंतु तो परत पुन्हा मुंबईला आला त्यावेळीं मात्र त्याला कितीकदां तरी वाटलें होतें कीं दयेला एकदां भेटावें म्हणून! तिला फोन करण्यासाठीं म्हणून त्यानें कितीदां तर टेलिफोनला स्पर्श केला होता. परतु थरारून त्यानें प्रत्येकवेळीं आपला हात मागें घेतला. कारण दयेनें आपल्याला भेटावं नि आपल्या परिस्थितीबद्दल चवकशी करावी हे त्याला आवडलें नसतें.

म्हणूनच दयेची भेट त्याला एका अर्थानं अप्रिय होती.

परंतु सहजगत्या त्याला दया भेटली.

त्यानें त्याला आनंद झाला. मनांतल्या मनांत त्यानें मिस आशेचे लाख-लाख आभार मानले.

जवळ जाऊन प्रताप म्हणाला,

' तुम्ही इथं कशा ? '

' मलाही हाच प्रश्न पडला कीं तुम्ही इथं कसे ? '

' मी इथं कसा हें तुम्हाला लवकरच मिस् आशा ओळख करून देतांना सांगतील.'

' असं होय. मग मिस् आशा माझ्याबद्दलच तेवढं सांगणार नाहीं म्हणतां ? '

प्रताप हंसला व म्हणाला,

' छे, तसं नाहीं म्हणत मी.'

' त्याचं असं आहे मि. प्रताप, मिस् आशाची एक भाची तिकडं रंगूनला आहे. तिचं नांव ज्योती. ती व मी कॉलेजमध्यें एकाच वर्गात होतों. ती माझी चांगली मैत्रिण आहे. ती शिकत असतांना ह्यांच्याकडं राहत होती. मी मिस् आशाच्या प्रेमळ आग्रहावरून वर्षातून फक्त एकदांच येते. अन् तेही त्यांच्या वाढदिवसा दिवशीं. कारण जेवायचं असतं ना ? '

असें म्हणून दया हसूं लागली. प्रतापनें विचारलें, 'परंतु एरव्ही कां नाहीं जात त्यांच्याकडे तुम्ही?'

'कारणें आहेत त्याला. मग सांगेन मी तुम्हांला,' गंभीर होऊन दया म्हणाली.

दयेनें मग प्रतापला त्याच्या खोलीचा पत्ता विचारला. तो त्यानें सांगितल्यावर दया म्हणाली,

'ठीक आहे. उद्यां सायंकाळीं सहा वाजतां येईन मी तुमच्याकडे. तुम्हांला मला एकदां ह्या मिस् आशापासनं सावध करावसं वाटतं.'

'कां बरं?'

'उगीचंच.'

मोठ्या बेफिकीरीनें दया म्हणाली. परंतु असा प्रश्न प्रतापनें विचारायला नको होता हें तिनें त्याला त्यांत ध्वनित केलें.

त्यानंतर जेवणाची वर्दी आली.

जेवण आटोपल्यानंतर जेव्हां सगळी मंडळी दिवाणखान्यात गप्पा मारत बसली तेव्हां सगळा दिवाणखाना सुवासिक तंबाखूच्या धुम्रवलयांनीं छतापर्यंत भरून गेला. दयेसाठीं मोटार आणल्याची वर्दी घेऊन जेव्हां ड्रायव्हर आला तेव्हां दयेनें मिस् आशेचा व सगळ्या मंडळींचा निरोप घेतला. खालीं मोटारपर्यंत गेल्यानंतर तिनें प्रतापला बोलावून घेतलें. ती त्याला म्हणाली,

'उद्यां सायंकाळीं मी येईन नक्की.'

'या, ना. मी अवश्य राहीन कीं.'

'ठीक आहे, गुड नाईट.'

'गुड् नाईट.'

हळूंहळूं एकेकजण उठून जाऊं लागला. प्रतापनेंही मध्यंतरी एकदोनदा उठण्याचा प्रयत्न केला. परंतु दरवेळीं आशेनें त्याला जाऊं दिलें नाहीं. अर्थात् नाईलाजानें त्याला बसावें लागलें.

आतांतर सगळेजण उठून गेले. दिवाणखान्यांत कुणीएक उरलें नाहीं बंगल्याच्या आवारांत सर्वत्र स्तब्ध झालें. क्वचित आशेची कुत्री गुरगुरत होती.

स्नानगृहांत नळ धो धो वाहत होता अन् त्या धारेखालीं जेवणाची भांडीं धुतलीं जात होतीं. त्याचा आवाज अस्पष्ट पण समजण्यासारखा ऐकूं येत होता.

प्रतापला आशेनें आपल्या शय्यागृहांत नेलें. तिच्या हेतूची नक्की कल्पना न आल्यानें तोही मुकाट्यानें गेला.

प्रथम आशेनें दिवा उजळून खिडकी उघडली. प्रतापला आपल्या शय्येवर बसावयास सांगितलें.

आशेच्या विलासी शय्येवर प्रताप बसला अन् उशाशीं किंचित् रेलून तो तिच्याकडे पाहूं लागला.

खिडकीशीं ती उभी होती. तिला कांहींतरी धिटाईनें बोलावयाचें होतें. कारण ती चोरून प्रतापकडे पाही. परंतु तोही आपल्याकडे पाहत आहे हें लक्षांत येऊन ती दुसरीकडे पाहूं लागे.

अखेरीस तिनें मनाचा निश्चय केला व चांचरत म्हणाली,

'प्रताप.........'

'काय ?'

'एक विचारूं ?'

'हं.'

'राग येणार नाहीं तुम्हाला ?'

'परंतु राग येण्यासारखं कांहींच तुम्ही विचारणार नाहीं यांवर माझा विश्वास आहे.'

'असं असूनही समजा मी कांहीं विचारलंच तर ?'

'तरीही रागावणार नाहीं'

'ठीक आहे. मग विचारतेंच तर......'

'विचारा ना......'

'मद्य घ्याल तुम्ही ?'

'मद्य ! छे, छे भलतंच काय बोलतां तुम्ही. मी अद्याप शिवलों नाहीं दारूला.'

‘ अस्सं. म्हणजे या आयुष्यांत दुःखानं फारसे होरपळलेले दिसत नाहींत तुम्ही. तुम्ही मद्य घ्यायला सुरुवात करा. सुखाची नि आनंदाची विझणारी जोत मद्याशिवाय प्रज्वलित होत नाहीं. मद्याचे छोटे छोटे घोट एखाद्या शिलेदाराप्रमाणं तुमच्या हृदयांत जाऊन तेथील दुःखाला, निराशेला नि काळजीला हांकून लावतील. खरंच प्रताप घ्याच तुम्ही मद्य.’

मग आशेनें कपाट उघडून त्यांतील मद्याची बाटली काढली. मद्याचा उथळ प्याला तिनें कांठोकांठ भरून प्रतापसमोर ठेवला.

प्रतापला काय करावें तें समजेना. तो गोंधळून गेला. मद्य न घेतां निघून जाणें बरें दिसणार नाहीं म्हणून त्यानें त्याचा एक घोट तेवढा घेतला व पेला खालीं ठेवला.

त्या पेल्यांत उरलेलें मद्य आशेनें झटकन् रिकामें केलें.

प्रताप तेथून लगेच निघून गेला.

# ११

## प्रतापसाठीं !

दुसरं दिवशीं प्रतापकडे जायला म्हणून दया पातळ बदलत होती. त्यावेळीं तिच्या मनांत सारखा एकच प्रश्न घोळत होता; आपण प्रतापकडे आपुलकीनं कां पाहतो ?

वास्तविक प्रतापचा अन् तिचा परिचय होऊन फार दिवस झाले होतं असं नव्हे ! परिचय झाल्यानंतरही तो तिच्याशीं फार दिवस सारखा बोलत होता असं सुद्धां नाहीं. प्रतापनं आपल्या सांपत्तिक स्थितीबद्दल दयेसमोर कधींच बढाई मारली नाहीं. आपल्या सांपत्तिक स्थितीबद्दल बोलण्याचा प्रतापचा मुळीं स्वभावच नव्हता. इतकेंच नव्हे तर तो नागपूरला वकिली करणारा एक बऱ्यापैकीं सुखी तरुण आहे एवढीच त्याच्याबद्दल खासगी अशी माहिती दयेला होती.

परंतु इतकें जरी होतं तरी दयेचें प्रतापबद्दल प्रथम दर्शनीच अत्यंत अनुकूल मत झालं. सुविद्य, सभ्य, कुलीन, निर्भीड असे अनेक सद्‌गुण प्रतापच्या ठिकाणीं तिला दिसून आले. प्रतापच्या पूर्वीं एकदोन तरुण तिचे स्नेही होते. परंतु पुढें पुढें करण्याची त्यांची कुलंगी वृत्ती तिला आवडत नसे.

दयेनें पातळ बदललें. पातळाच्या किरमीजी रंगाला शोभून दिसणारा ब्लाऊज तिनें घातला. मग एकवार समोरच्या पुरुषभर उंचीच्या आरशासमोर उभे राहून पदर ठाकठीक केला.

दया मोटारींत येऊन बसली. पुन्हां तिनें आपल्या मनाशीच विचारलें, खरंच आपल्याला प्रताप आवडतो हें खरें कां ?

अर्थात् तें खरें होतें.

प्रताप दयेला आवडला होता त्याला एक सूक्ष्म कारण होतें आणि तें म्हणजे कॅप्टनसाहेब !

दयेचे पपा म्हणजे मनुष्य स्वभावाचा एक नमुना होता.

गरीबीतून वर येऊन आयुष्याच्या सुरवातीला ज्यांना खूप पैसा मिळूं लागतो असे लोक कांहीं वेळां घमेंडखोर होणें अपरिहार्य असतें. युद्धाच्या स्वैर व अनिर्बंध वातावरणांत राहून परत आल्यानें युद्धकाळीं ज्या गोष्टींचें स्वरूप अगदीं सामान्य समजलें जातें अशा व्यसनाचा त्यांना नाद लागला होता. तशांत दयेला जन्म देऊन तिची आई दयेला एकटी सोडून गेल्यानें पत्निनिधनाचें दुःख त्यांच्या हृदयाला जाऊन भिडलें. त्याचा परिणाम कॅप्टन साहेबांना जबर व्यसनाधीन करण्यांत झाला.

दया मागेल तितके पैसे तिच्या शिक्षणाला द्यावे या पलिकडे ते दयेच्या कोणत्याच बाबतींत लक्ष घालीत नसत. प्रतापनें दयेशीं स्नेह केला असता तर एरव्ही कॅप्टनसाहेब रागावले नसते हें निश्चित ! परंतु आतां तसें राहिलें नव्हतें ! कॅप्टनसाहेबांच्या डोक्यावर कांचेची फुलदाणी फोडून त्यानें त्यांचा अक्षम्य गुन्हा केला होता. आणि म्हणूनच प्रतापशीं दयेनें बोलूं नये किंवा त्याच्या नांवाचा मुळीसुद्धां उल्लेख करूं नये असें कॅप्टनसाहेबांना वाटे.

कॅप्टनसाहेबांच्या अंतःकरणांत प्रतापविरुद्ध निर्माण झालेली तेढ त्यांनीं वेळोवेळीं दयेजवळ बोलून दाखवली. परंतु लहानपणापासून बापाबद्दल अत्यंत प्रतिकूल ग्रह निर्माण होऊन तो सारखा वाढत गेल्यानें कॅप्टनसाहेब जसजसा प्रतापबद्दल तिरस्कार व्यक्त करीत नसतसा प्रताप आपल्या जवळ जवळ येतो असें दयेला वाटे.

‘ ठीक आहे. गुड्नाईट.’

दया गेली.

प्रताप जिना चढून वर आला. तेव्हां त्याला आठवलें, अरे ! आपण किती वेडे !! आपुलकीनं जी आपल्याकडं येते तिला आपण चहासुद्धां विचारला नाही. छे, छे किती गावंढळासारखे वागलों आपण !

मग दया पुन्हा येते केव्हां आणि आपण तिला चहा विचारतों केव्हां अशी प्रतापला सारखी चुटपुट लागून राहिली.

दुसरे दिवशीं जेव्हां दया आली तेव्हां तिचे त्यानं स्वागत केलं व नोकराला लगेच सांगितले,

‘ हें पहा कोपऱ्यावर दोन चहा सांग.’

प्रतापच्या त्या घाईचे कारण ओळखून दया म्हणाली,

‘ दोन कां तीन ?’

‘ तिसरा कप कुणासाठी ?’

‘ तुमच्यासाठीं एक कप अन् माझ्यासाठीं दोन……’

‘ म्हणजे ? ’

‘ म्हणजे असं कीं कालचा एक अन् आजचा एक असे दोन नाहीत कां ?’

प्रताप हंसला. आपल्या मनांतील घाई ओळखून त्याचा तिनें केलेला मार्मिक उल्लेख त्याला फार आवडला.

चहा घेतल्यानंतर प्रतापनें सिगारेट शिलगावली.

मग तो दयेला म्हणाला,

‘ काल तुम्ही मिस् आशाबद्दल काय सांगणार होतात ?’

‘ हें पहा मिस् आशा ही अत्यंत वाईट बाई आहे. मी तिच्याकडं कधींच जात नाहीं याचं कारण तिला फार वाईट व्यसनं आहेत. कॉलेजच्या आयुष्यात मी अन् ज्योती–आशाची भाची, जिवश्च कंठश्च मैत्रिणी होतो. त्याचं कारण एकच ! आमचे पपा अन् तिची मावशी ह्यांचे सारखेच दुर्गुण, अन् त्यांना सारखींच व्यसनं—

‘ असं !’

‘ खरंच प्रताप, मला नक्की माहिती आहे. दारू पिणारे लोक मला बिलकूल आवडत नाहीत. तुम्ही तिच्या वाऱ्याला उभे मुद्दां राहूं नका. विलक्षण मद्यपी आहे मिस् आशा. मी तर म्हणतें तिच्याशीं तुम्ही बोलूं मुद्दां नका.’

त्यावर प्रताप खो खो करून हंसला.

‘ कां ?’

‘ हंसलों अशासाठीं कीं मी आहे तिचा असिस्टंट. तेव्हां तिच्याशीं बोलायचं नसेल तर मला नोकरी सोडावी लागेल.’

‘ या आशेशीं संबंध असण्यापेक्षां ही नोकरी सोडलेली चालेल. खरंच प्रताप, शी इज् अ डेव्हील.’

प्रतापला संशय आला. दयेनें असें म्हटलें तेव्हा तिच्या शद्बाशद्बात कळकळ भरलेली त्याला दिसून आली. परंतु ह्या कळकळीबरोबर आशेबद्दल वाटणारा नैसर्गिक मत्सर त्यांत दिसत येत आहे असा प्रतापला संशय आला.

दया असें बोलून गेली खरी ' परंतु मागाहून तिला वाईट वाटलें. तिला राहून राहून वाटत होतें कीं प्रताप शिक्षक होण्यासाठीं जन्माला आला नाहीं. कोण कशासाठीं जन्माला येतो हें जरी तिला समजत नव्हतें तरी प्रताप येथे अशा परिस्थितींत शिक्षकाचा व्यवसाय करतो हा त्याच्या दुर्दैवाचा प्रकार आहे असे तिला निश्चित वाटूं लागलें. म्हणूनच आपण आपल्या बोलण्यानें त्याच्या भावना चुकून दुखवल्या तर नाहींत ना ह्या कल्पनेनें दयेचें मन व्याकूळ झालें.

नंतर दया फार वेळ बसली नाहीं.

त्यानंतर त्याबद्दल आपापसांत न ठरवतांही संध्याकाळची सहा वाजतांची वेळ म्हणजे प्रताप व दयेंत भेटीचा संकेत ठरला. दया नियमितपणें सायंकाळीं सहा वाजतां प्रतापकडे येत असे. तेथून ते दोघेही थोडें दूर फिरून येत. फिरावयास गेले नाहींत तर ते दोघेही प्रतापच्या खोलींत गप्पा मारत बसत.

प्रतापला ही वेळ चुकवणें अशक्य होऊन बसलें. दयेची भेट एक दिवसही चुकवण्यास कारण घडूं नये म्हणून त्यानें मिस् आशेला सिनेमासाठीं एक महिन्यांत जवळ जवळ आठदां नकार दिला असेल. तेवढ्याच वेळां तिनें आणलेलं

मद्य त्यानें परत केलें. दया जसजशी मिस् आशेबद्दल वाईट भाषा वापरूं लागली तसतशी प्रतापला तिच्याबद्दल अधिकाधिक तिरस्कार वाटूं लागला.

असा एक महिना निघून गेला.

एक विचित्र गोष्ट त्या सुमाराला घडून आली.

मध्यंतरी कॅप्टनसाहेबांच्या म्हाताऱ्या मोटार ड्रायव्हरची व त्यांची बाचाबाची होऊन त्यानें ती नोकरी सोडून दिली. त्याच्याऐवजीं कॅप्टनसाहेबांनीं सहेलीच्या शिफारशीनें एका तरुण मुसलमान ड्रायव्हरची नेमणूक केली.

त्याचें नांव मौसिन अली !

मौसिन म्हणजे पंचविशींतील एक छोकरेवजा धिप्पाड जवान होता. त्याचा चेहरा बसकट व चौकोनी होता. लालबुंद ओठावर त्यानें मोठी ऐटदार मिशी राखली होती.. तिची टोकें नेहमीं वर वळवलेलीं असत, पाहणाऱ्याला वाटावें कीं स्वारी कुठली तरी अमीर अगर नबाब असावी. तो दारू घेत होता म्हणून कीं काय, त्याचे डोळे नेहमीं लालबुंद दिसत. त्याच्या डाव्या भुंवईच्या बरोबर मधोमध कपाळभर कसल्यातरी खोल घावाचा उभा चर होता. तो पाहून त्याचा चेहेरा पाहणारास विलक्षण मग्रूर दिसे.

थोडक्यांत म्हणजे मौसिनचा चेहेरा पाहून क्वचितच् चांगलें मत होई.

दयेचेंही मौसिनबद्दल अत्यंत वाईट मत झालें.

परंतु जसजसें दयेचें मौसिनबद्दल अत्यंत प्रतिकूल मत होत गेलं तसतसें कॅप्टनसाहेब त्याची बेफाम स्तुती करत होते. ते मौसिन अलीला दयेच्यासमोर कधी अली म्हणत तर कधी 'बेटा मौसिन' म्हणून हांक मारत. जेव्हां ते खुषींत येत तेव्हां ते मौसिनला खांसाहेब असें सुद्धां म्हणत. तात्पर्य, ज्याचेबद्दल लेकीला चीड त्याचेबद्दल बापाला विलक्षण आस्था हा प्रकार मौसिनअलीबद्दलही पाहावयास मिळूं लागला.

दयेचें त्याच्याबद्दल अतिशय वाईट मत झालें व तसें तिनें तें पपासमोर बोलूनही दाखवलें. पण उपयोग काय ?

दिवसें दिवस दया आपली मोटार प्रतापकडे नेण्याचें टाळूं लागली. मौसिन व्रात्य होता हें तिला ठाऊक झालें होतें. म्हणूनच त्याला शक्य तितका टाळण्याचा ती प्रयत्न करीत असे.

परंतु आज दुपारीं तिनें मौसिनला सायंकाळीं मोटार आणायला सांगितली होती.

पांचच्या सुमाराला ती आरशासमोर ब्लाऊजच्या गुंड्या लावत होती. दार उघडून मौसिन आंत आला. दार उघडेंच होतें कारण पातळ बदलतांना आंतून कडी लावण्याची तिला कधींच जरूर वाटत नसे.

इतक्या बेशरमपणें मौसिन आलेला पाहून दया अत्यंत संतापली. ती त्याला म्हणाली,

'अली, तुला कांहीं शरम वाटू दे.'

'मलिका, मी गरीब बिचारा बेगुनाह—'

'चूप. चालता हो. हलकट, नीच कुठला.'

'मी विचारायला आलों तें गाडीबद्दल.'

'तुला सांगितलं नाहीं कां गध्ध्या बरोबर पांच वाजतां म्हणून......'

'जी हां' म्हणून मौसिन तेथून गेला.

परंतु अत्यंत बेशरमपणें त्यानें जातांना गज़लची लकेर छेडली.

'मस्ताना बना दे SS'
दिवाना बना दे SSS'

दयेला तें मुळीसुद्धां आवडलें नाहीं. परंतु तिचा इलाज नव्हता.

आपला पोषाख करून दयेनें बूट घातला. मनःक्षोभांतच ती दिवाणखान्यांत गेली. ती दिवाणखान्यांत कां गेली हें तिचें तिलाच ठाऊक नव्हतें. परतु ती गेली हें मात्र खरं! रागाच्या भरांत ज्या अर्थशून्य कृती हातून घडतात त्यां पैकींच ही एक दुसरें काय?

दिवाणखान्यांत कॅप्टनसाहेब कुणाचीतरी वाट पाहत बसले होते. दयेला पाहतांच ते करड्या आवाजांत म्हणाले,

'दया.'

दयेनें ओळखलें. कॅप्टन साहेबांच्या आवाजांत तीव्रता होती. त्यामुळें तिचें हृदय धडधडूं लागलें. दया कॅप्टन साहेबांच्या समोर येऊन बसली.

‘ दया, तुला शरम वाटायला पाहिजे. ’

‘ कशाबद्दल ?’

‘ तूं नेहमीं त्या उडाणटप्पूकडे जाते हें कळलं मला.’

‘ कळलं म्हणजे तुमच्या लाडक्या खांसाहेबांनीं सांगितलं असेल.’

‘ चूप, बोलूं नकोस. मला हें पटत नाहीं आणि मला न पटणाऱ्या गोष्टी कोणी केल्या तर त्या मला आवडतही पण नाहींत.’

‘ परंतु पपा, प्रतापनं असा गुन्हा काय केला ? ’

‘ तं मी जाणत नाहीं. मला एवढं माहित आहे कीं बदमाष लोकांशीं तूं स्नेह करूं नयेस.’

‘ तें मला माहित आहे पपा. बदमाष लोकांच्या वाऱ्याला सुद्धां मी उभी राहत नाहीं. तुमच्या सहेलीशीं बोलतांना कधी पाहिलं तुम्ही मला ? तुमच्या ब्रँगझाचं मी तोंड सुद्धां कधीं पाहत नाहीं. फोनवर बोलणाऱ्या तुमच्या एकाही अँग्लोइंडियन मैत्रिणीला मी चहाला बोलावलं नाहीं. मौसिनशीं बोलणं मला आवडत नाहीं. या सगळया बदमाषांच्या वाऱ्याला सुद्धां मी उभी राहत नाहीं.’

‘ चूप कारटे...’

‘ नको, नको पपा...हाय ! ’

कॅप्टनसाहेबांच्या हातांतील बारीक वेताची छडी वळवळून दयेच्या मांडीवर बसली. त्याच्या पाठोपाठ मांडीवर सुजून टापसलेल्या वळावर हात कोमाळत कोमाळत तिनें गद्‌गदून रडायला सुरुवात केली.

मग त्या दिवशीं कांहीं दया प्रतापकडे गेली नाहीं.

# १२

## बाहुपाशांतील रात्र--

कॅप्टनसाहेबांच्या ह्या असल्या वर्तनानें झालें; काय तर एखादा स्पंज पिळून कोरडा करावा त्याप्रमाणें दयेचें हृदय आपल्या वडिलांबद्दल झालें. आपल्या वडिलांची तिला चीड आली. तिच्या हृदयाच्या कोणत्याही कोपऱ्यांत पितृप्रेमाचा थेंब शिल्लक राहिला नाहीं. कॅप्टनसाहेबांचा आश्रय विषारी वृक्षाच्या सावलीप्रमाणें आपल्या आयुष्यांतील कोंवळी पालवी केव्हां सुकवून टाकेल ह्या-विषयीं दया शंकित झाली.

त्यानंतर दोन दिवसांत दया अधिकाधिक दुःखी होऊं लागली. तिला कांहीं सुचेना. आत्यंतिक दुःखावेगाच्या वेळीं मनुष्याला ज्याप्रमाणें गतस्मृती तीव्रतेनें होऊं लागते त्याप्रमाणें दयेचें झालें. कॅप्टनसाहेबाबद्दल समाजांतील प्रतिष्ठित व कंगालांतले कंगाल इसम कोणत्या शद्बांत निंदा करत तें तिला आठवलें. ज्यांच्या स्नेहानें सुशिक्षित इसमानें लाजेनें मान खालीं घालावी असे कॅप्टनसाहेबाचे सगळे मवाळी स्नेही दयेला आठवले. खालच्या दिवाणखान्यांतून तिच्या माडीवरच्या खोलींत नित्यशः ऐकूं येणारे व मध्यरात्रीपर्यंत चालणारें

अत्यंत चटोर संभाषण, सोड्याच्या बाटल्याचे फटत्कार व उन्मत्त हास्याचा स्वैर खळखळाट तोही तिला ताजेपणाने आठवला.

तिनें क्षणार्धांत कॅप्टनसाहेबांशीं स्वतःची तुलना केली. मग तिला वाटलें, जिनं कन्या धर्माचं पालन अत्यंत काटेकोरपणानं केलं तिला त्याचं फळ काय मिळालं? आपल्या प्रामाणिक वृत्तीची काय विचित्र विटंबना झाली ही......

दयेनें आपल्या वडिलाबद्दलचे सगळे विचार मोठ्या कष्टानें घालवून दिले. तिनें प्रतापबद्दल अखेरचा निश्चय ठरवला. एखाद्या सुंदरीनें आपल्या दासींना हाकून देऊन तिच्या संगमरवरी प्रासादाच्या सज्जांत जावे नि आपलें गिरेंबाज कबूतर कुरवाळीत राहावें त्याप्रमाणें तो एकटा एकच सुखद विचार दया राहून राहून आठवू लागली.

त्यावेळीं क्षणभर तिला वाटलें कीं हा विचार योग्य आहे यांत शंकाच नाहीं. परंतु आपण ज्यावेळीं हा अमलांत आणायचा म्हणतो तो दिवस म्हणजे परवांच नाहीं कां? मग अशावेळीं आपल्या हातून हा उतावेळपणा तर होणार नाहींना? आपल्या अशा वागण्यानं आपल्या स्वभावांत भावनेची उथळ खळखळ फार आहे असं तर प्रतापला वाटणार नाहीं ना?

छे, तें शक्य नाहीं.

दयेनें आपल्या मनांतील विचार सगळे थांबवले.

मध्यंतरीं तीनचार दिवस दया गेली नव्हती व आजही गेली ती आपली नेहमींची वेळ टाकूनच! म्हणजे त्यावेळीं सात वाजायला आले होते.

जिना चढून ती वर आली तेव्हां प्रताप आपल्या दाराला कुलूप घालत होता.

त्यावेळीं तो दयेकडे पाठमोरा होता. त्याचा पोषाखही अगदीं साधा होता. सैल रेशमी बंगाली सद्रा, परीटघडी धोतर व पायांत पांढराशुभ्र जाळीदार बूट! त्याच्या गोल व जाडजूड खांद्यावर गंजिफ्रॉकच्या अरुंद उभ्या पट्या शर्टच्या आंतून मोठ्या खुलून दिसत होत्या.

दया क्षणभर न बोलतांच त्याच्याकडे पाहत उभी राहिली.

प्रतापनें कुलूप बंद केलें व तो जिन्याकडे जावयास वळला तेव्हां त्याला दया दिसली. तिला पाहतांच त्यानें दोनही हात वर करून तिला नमस्कार केला व कुलूप काढत काढत दयेला तो थट्टेनें म्हणाला,

'वा खूप आहेस कीं तूं!'

'म्हणजे!' आश्चर्यानें दयेनें विचारलें.

'तूं दोन तीन दिवस आली नाहींस तेव्हां म्हटलं ही कुठं बाहेरगांवीं तर गेली नाहींना!'

'तरीच पपा मला आता म्हणालेच होते कीं प्रतापचें गेल्या दोन दिवसांत दोनशेच्यावर तरी फोन आले असतील. अन् दरवेळीं ते मला विचारायचे काहो ही दया आतां येणार तरी केव्हां!'

'वा खूप आहेस! तूंच मला सांगितलंस कीं मी घरीं तुझ्यासंबंधी चौकशी करणं अगर घरीं येणं कॅप्टनसाहेबांना आवडायचं नाहीं म्हणून! आणि वर माझी अशी निर्दय थट्टा करतेस.'

'ओ, हो. राग आला वाटतं?'

झालें! मग प्रयत्न करूनही रागाचा आविर्भाव प्रतापला साधेना.

खुर्चीच्या हातावर रेलून दयेनें विचारलें,

'कुठं निघाला होता तुम्ही?'

'तुझ्याकडं.'

दयेनें हंसून त्याच्या बोलण्याच्या सत्यतेबद्दलचा संशय खट्याळपणें प्रगट केला.

तेव्हां गंभीर होऊन प्रताप म्हणाला,

'खोटं नाहीं सांगत मी.'

'पण मी कुठं म्हणतें.'

दया खुर्चीवर बसली नाहीं हें प्रतापच्या लक्षांत आलें.

'कां, बैसना.'

'नको. आपण जाऊं या नाटक पाह्यला.'

‘ नाटक ?’

‘ हो. कां ? नाटक आवडत नसेल तर सिनेमा.’

‘ आवडत नाहीं म्हणून नाहीं. तुला उशीर नाहीं कां होणार ? तुला उशीर होईल नाटकामुळं अन् तिकडे कॅप्टनसाहेब देतील पोलिसांत वर्दी.’

‘ मग काय होईल ?’

‘ मला कांहींच नाहीं होणार. अन् झालं तरी त्याचं मला कांहींच महत्व वाटत नाहीं. पण तूं—’

‘ एक विसरूं नका प्रताप तुम्ही. कायद्याच्या भाषेंत मी सज्ञान आहे. ज्या क्षणाला वडिलांचं छत्र नकोसं होईल त्या क्षणाला मी तिथून निघून जाऊं शकतें.’

‘ म्हणजे ? दया—’

त्यावर दया कांहींच बोलली नाहीं. परंतु ती गंभीर झालेली पाहून प्रतापनें तिला जास्त कांहींच विचारलें नाहीं. कॅप्टनसाहेबांचा आणि तिचा खटका उडाला हें त्यावरून स्पष्ट दिसत होतें. तो न बोलतां जिना उतरून आला. रस्त्यांत एक टॅक्सी ठरवली व दयेनें सांगितलेल्या नाटकगृहाकडे जाण्यासाठीं म्हणून ड्रायव्हरला फर्मावलें.

प्रतापनें दयेकडे पाहिलें. दया आली त्याचवेळीं त्यानें दयेकडे आतांसारखें निरखून पाहिलें असतें तरी आज दया कांहीशी उदासीन व कठोर दिसून राहिली आहे हें त्याला चटकन् कळलें असतें. तिनें आपली दृष्टी मांडीवर पातळाच्या गोल ठिपक्याकडे लावली होती. वास्तविक तो जवळ असतांना आपली चंचल नजर गोळा करून शून्यांत बघत राहण्याचा तिचा स्वभाव नव्हता. दया स्वभावानें थोडीफार गंभीरच होती हें खरें ! परंतु तिच्या नजरेचा विलास गांभिर्यापेक्षां खेळकरपणानेंच अधिक विलोभनीय दिसून येई हेंही तितकेंच खरें ! शिवाय तिनें नेहमीप्रमाणें आपली वेषभूषा केली नव्हती. फार कशाला शय्येंतून नुकतीच उठून आल्याप्रमाणें तिचे केस विस्कळीत झाले होते तेही तिनें नीट बसवले नव्हते !

दयेचा व कॅप्टनसाहेबांचा खडका उडण्याचें कारण मनाशीं शोधत तो असा बसला असतां दया ड्रायव्हरला म्हणाली,

'ए, ड्रायव्हर थांब.'

'कां ? नाटकाला चलायचं म्हणालीस ना तूं ?'

'परंतु राहित करूं या तो बेत. कुठं तरी हॉटेलांत आपण जेवण घ्यायला जाऊं या. चला.'

'मग एक सुचवूं ? माझ्याकडं डबा येतो तर आपण माझ्या खोलींतच जेवण करूं.'

'छान ! दॅट् इज ए बेटर आयडिया इंडिड.'

दया हंसली खरी. परंतु तें हंसणें खोटें आहे हें प्रतापला समजल्याशिवाय राहिलें नाहीं. तिची उद्विग्न मनःस्थिती व मंदावलेला खेळकरपणा पाहून प्रतापनें तूर्त एवढेंच ठरवलें कीं तिच्या कलानं घ्यायचें !

म्हणून तो येऊन पोंचला व गड्याला डबा आणायला पाठविलें तेव्हां दयेला विचारून एका हॉटेलांतून थोडीशी रबडीही आणावयास त्यानें त्याला सांगितलं. त्याचा डबा येईपर्यंत दया शांतपणानं बसली होती तिच्याजवळच प्रताप बसला. त्यानें टेबलवरचा ताजा टाईम्स उचलला व तो वाचावयास सुरुवात केली.

डबा आल्यानंतर प्रताप उठायला लागला परंतु दयेनें त्याला उठूं दिलें नाहीं. वेताच्या दोन खुर्च्या तिनें समोरासमोर घेतल्या व टेबलवजा छोट्या स्टूलवरचें सामान काढून बाजूला ठेवलें. मग तो स्टूल तिनें त्या दोन्ही खुर्च्यांच्या मध्यें ठेवला. नोकराकडून तिनें त्या स्टुलावर दोन ताटें स्वच्छ करून ठेवलीं. तीं ताटें वाढून झाल्यानंतर दया म्हणाली, 'या प्रताप.'

अर्थात् प्रताप मुकाट्यानें उठला व त्यानें जेवावयास सुरुवात केली.

जेवतांनासुद्धां प्रताप दयेशीं फारसा बोलला नाहीं. मध्यंतरी त्याला दोन तिनदां त्याचें कारण विचारण्याचा मोह झाला. परंतु तो त्यानें मोठ्या कष्टानें आवरला. दरवेळीं त्याला वाटे, दयेच्या बावरल्या मनःस्थितीचं कारण जर बरंच नाजूक असेल तर आपल्या या चौकशीनं त्याची आठवण विसरण्याचा तिचा प्रयत्न व्यर्थ ठरेल. मग ती आठवण जागी होऊन दयेचा किती छळ करेल याची कल्पनासुद्धां करतां येणार नाहीं.

त्यांचें जेवण आटोपलें.

प्रताप धूम्रपान करीत होता. दया टाईम्स चाळत होती, आणि प्रतापचा नोकर जेवणाचीं भांडीं धूत होता.

दयेनें जांभई दिली, टाईम्स बाजूला टाकून दिला व अंगाला आळोखे-पळोखे देऊन आपली मान खुर्चीच्या पाठीवर टेकवली.

तेव्हां प्रताप म्हणाला,

'झोंप यायला लागली तुला. चल जाऊं या.'

दया हंसली व म्हणाली,

'कां ? इथं झोपेन अशी भीति वाटते तुम्हांला ?'

'हो। हो कां न वाटावी ?'

'म्हणजे !'

'तूं इथं झोपण्याचं नाहीं कांहींसं मोठं ! परंतु तुला झोपेंत बरळण्याची संवय आहे असं तूंच नव्हतं कां मला एकदां सांगितलं ?'

'हो खरंच ! मग पाहतेंच मी आज तुम्हांला माझ्या बरळण्यापासून किती त्रास होतो त !

'म्हणजे ! दया !! काय म्हणतेस तूं !!! '

प्रताप आश्चर्यचकित झाला हें कांहीं खोटें नाहीं. दया आपल्या इतक्या जवळ अशी कधीं झोंपेल ही त्याला स्वप्नांतही कल्पना आली नाहीं. त्याला त्याच्यांत व दयेंत असलेलें प्रत्येक प्रकाराचें अंतर नकोसें झालें होतें. परंतु शरीराचें व मनाचें अंतर उल्लंघण्यासाठीं इतक्या धिटाईनें दया पाऊल टाकेल असें त्याला कधींच वाटलें नाहीं. म्हणून तो आश्चर्यानें स्तिमित झाला. तें ऐकल्यानें त्याच्या शरीरावर आनंदाचे रोमांच उभे राहिले, परंतु त्याचबरोबर त्याच्या हृदयाचा भीतीनें थरकांप उडाला. भीति वाटली ती त्याला दयेबद्दल ! दया आपल्याकडे येते जाते हें कॅप्टनसाहेबांना कळलें असावें असा दयेला आलेला संशय चारपांच दिवसापूर्वी प्रतापजवळ बोलून दाखवला होता. परंतु दयेनें आपल्या येथें एक रात्र काढली हें जर कॅप्टनसाहेबांना कळलें तर ते आकाशपाताळ एक करतील व दयेला नाहीं नाहीं त्या प्रकारें छळतील ! व्यसनी

व निरंतर पापाच्या कर्दमांत लोळणाऱ्या इसमांना दुसऱ्यांनीं यत्किंचितही वावगें वर्तन केलें तरी तें खपत नाहीं.

प्रताप असा विचार करीत होता तर आपला पक्का केलेला विचार दयेनें लगेच अंमलांतही आणला.

नोकराला सांगून दयेनें प्रतापच्या बिछान्यामधील एक गादी आणवली व प्रतापच्या बैठकीच्या खोलींत नोकराकडून ती घालून घेतली. मग प्रतापचें लक्ष आपल्याकडे वेधून घेण्यासाठीं ती म्हणाली,

'अच्छा गुडनाईट, प्रताप.'

दयेनें आपलें अंग टाकलें.

गादीवरील पांढऱ्या शुभ्र पलंगपोसावरील चित्रविचित्र ठिपक्याच्या पातळांत व ब्लाऊजमध्यें अवगुंठित झालेली दयेची मूर्ति प्रतापला मोठी मोहक वाटली. तो हंसून म्हणाला,

'अच्छा, गुडनाईट.'

मग प्रताप झोंपायला गेला.

प्रताप आपल्या बिछान्यावर पडला खरा परंतु त्याला झोंप येण्याचें चिन्ह दिसेना.

दूर कोपऱ्यावर ट्रॅम गाड्या येऊन थांबत. त्यांचे तालबद्ध ठेके त्याला बराच वेळ ऐकूं येत होते. आवाराच्या भिंतीशीं फुललेल्या ताटव्याचा सुवास त्या खोलींत दरवळत होता. दिवा मालवल्यानें त्या खोलींत अंधार होता खरा परंतु समोरच्या गॅलरींत बत्ती बराच वेळ प्रकाशत होती. तेथून एक प्रकाश-शलाका कांचेच्या तावदानावर व तेथून त्याच्या शय्येवर परावर्तित झाली होती. मानेखालची एक उशी प्रतापनें मग हाताच्या कोपराखालीं घेतली व छातीवर स्वस्तिकाकार हात ठेवून निद्रेच्या कुशींत शिरण्याचा तो प्रयत्न करूं लागला.

लवकरच प्रतापला झोंप आली.

त्याला दचकून मध्येंच जाग आला तेव्हां रात्र किती निघून गेली तें समजण्याला मार्ग नव्हता, भिंतीवरच्या घड्याळाची तालबद्ध संथ टिक् टिक्

सुरू होती. गॅलरींतील दिवा विझला होता. ती वद्यपक्षांतील अष्टमीची तिथी असल्यानें चंद्र क्षितीजावर उगवला होता. त्याची पिवळट किरणें खिडकींतून आंत आलीं होतीं. तीं ओघळून फरशीवर त्यांचा लांबट चौकोन झळकत होता.

त्याच्या खोलीचें दार हलक्या हातानें लोटलें गेलें तें त्याला समजलें. कुणी-तरी आंत प्रवेश केला. समोर ,समोर सरकणाऱ्या आकृतीवरून ती दया होती हें ओळखायला प्रतापला फारसा वेळ लागला नाहीं.

त्यानें स्वस्थ पडून रहायचें ठरविलें.

दया त्याच्या शय्येजवळ येऊन उभी राहिली. तेथें उभे राहावें किंवा परत जावें ह्या विचारानें ती क्षणभर गोंधळून गेली. परंतु तिनें आपल्या मनाशीं निश्चय केला. ती मग प्रतापच्या पलंगाच्या कडेवर बसली. व अनावर होऊन प्रतापच्या वक्षःस्थळावर आपलें तोंड झांकून गद्गद् आवाजांत म्हणाली.

' प्रताप. '

दया मग ओक्साबोक्शीं रडायला लागली.

त्याक्षणीं प्रतापला काय करावें तें समजलें नाहीं पण तिच्या रडण्याचा पहिला भर ओसरेपर्यंत त्यानें तिच्या मृदुमुदुल केशपाशावरून हात फिरवला व तिचें मस्तक हलुवारपणें थोपटल्यासारखें केलें.

पाठीशीं टेकायला उशा घेऊन प्रताप बसला व त्यानें दयेला जवळ ओढली आपल्या रक्ताचा थेंब न थेंब उतावळा झाला असून आपल्या जीवनाचे सगळे पाझर आटून गेले असें त्याला वाटलें. त्यानें तिला अधिक जवळ ओढली. त्याच्या रेखीव हनुवटीला तिचे रेशमी केस भासले. तिच्या खोल व सावकाश चाललेल्या श्वासोश्वासाच्या उबेनें त्याचें सगळें शरीर थरारून गेलें.

दयेचा रडण्याचा भर ओसरला. प्रतापनें आवंढा गिळला व दयेचे दोनही गाल आपल्या तळहातांत धरून तिची दृष्टी आपल्या दृष्टींत मिळवून दिली. तो म्हणाला,

' दया, तुझ्या दुःखाचं कारण मला पुरतेपणीं उमगलं नाहीं. परतु एवढं खरं कीं आतां तुझ्या आयुष्यांत बदल झाल्याशिवाय सुखाची आशा व्यर्थ आहे. निदान माझ्या बाबतींत तरी असं झालं आहे खास ! म्हणून मी ठरवलं आहे—'

येथें प्रताप क्षणभर थांबला

'—म्हणून मी ठरवलं आहे,'

पुन्हा प्रताप क्षणभर घोटाळला. हंसून तो म्हणाला,

'मला तें बोलणं जमायचं नाहीं. पण मला वाटतं तुला तें समजलं असेल.'

दयेनं आपली दृष्टी खाली वळविली. प्रतापनें तिच्या भांगाचें व कपाळाचें चुंबन घेतलें.

# १३

# भयंकर निश्चय !

ज्यावेळीं दया प्रतापच्या बाहुपाशांत बद्ध झाली होती व दयेच्या श्वासोश्वासानें त्याची काया पुलकित झाली होती त्याचवेळीं मिस् आशा कुणाला तरी पत्र लिहीत होती.

पत्र फारसें असं मोठें नव्हतंच.

जेमतेम एक नोटपेपर तिनें भरून लिहिला असेल. पण तेवढेंच लिहितां लिहितां आतां मध्यरात्र टळून जाण्याची वेळ आली होती. तेवढा मजकूर लिहितां लिहितां एक दोन वेळां तिचे डोळे ओले झाले होते, बराचवेळ मध्यंतरी थबकून तिनें आपली दृष्टी समोरच्या कॅलेंडरकडे लावली होती, किती तरी वेळ तिनें आपलें पेन आपल्या हनुवटीवर टेकवून डोळे घट्ट मिटून घेतले होते. तेवढें तें पत्र लिहितांना तिच्या मनाला काय यातना होत असतील तें जरी कळणारें नसलें तरी एवढें मात्र खास कीं सावकाश चालणारी तिची पेन कसल्यातरी भाराखालीं दडपून गेली होती. आणि आतां तर तिच्यांत एक शब्दही लिहिण्याची शक्ति उरली असेल तर शपथ !

तिनें पेनला टोपण घातलें, पत्राची घडी केली व एकाखालीं एक असलेल्या तीन ड्रॉवरपैकीं दुसऱ्या ड्रॉवरमध्यें तें पत्र ठेवलें तिनें त्या ड्रॉवरचें कुलुप बंद केलें व किल्यांचा झोक सगळ्यांत खालच्या ड्रॉवरमध्यें ठेवून तें ड्रॉवर तिनें लोटून घेतलें.

त्यानंतर आशा आपल्या शय्येवर पडली. तिने निद्रेची आराधना करण्यास सुरुवात केली. झोंप येणें तर बाजूलाच राहिलें. परंतु तिचे डोळे सुद्धां मिटायला तयार नव्हते. शेवटीं तर तिनें पातळ रेशमी आलोवान डोक्यावरून घेऊन त्याचे काठ नीट डोक्याखालीं दाबून धरलें.

पण व्यर्थ !

भिंतीवरील घड्याळांत दोनचे टोले वाजले.

आशा उठली. खोली प्रकाशमान केली. मग तिनें कपाटांतील मद्याचा शिसा काढून एकामागून एक पेले भरायला सुरुवात केली.

सभोवतालचें सगळेंच वातावरण मोठें शांत होतें भिंतीवर घड्याळ तेवढें टिक्‌टिक् करत होतें.

आशेला हळूंहळूं आठवूं लागलें.

.........फ्रँक गॉर्डननें तिला कुरूप म्हटलें होतें. तिच्या कोवळ्या हृदयावर त्यानें मोठा निर्दय प्रहार केला होता. तिनें प्रयत्न केला परंतु फ्रँकनें केलेली जखम बुजली नाहीं. फ्रँकचें आणि तिचें किरकोळ भांडण वारंवार होई. नव्हे ! आपल्या भांडणानेंच तेवढी खरी प्रीति व्यक्त करतां येते असें समजणाऱ्या पुरूषांपैकीं तर फ्रँक नाहींना, अशीही शंका तिला वारंवार येई. आशेला भांडणें आवडत नसत. तिच्या स्वभावाला एखादवेळ कुणाला चिडखोरपणाची किनार आढळली तरी ती भांडकुदळ खास नव्हती. शांतताप्रिय माणसाचें पहिलें लक्षण म्हणजे भांडणापासून दूर राहणें हें आशा शक्य तितकें अमलांत आणत असे.

परंतु असेंही जरी असलें तरी भांडखोर फ्रँकला सोडणें अन् त्याच्या दूरदूर राहणें तिच्या जिवावर आलें. याचें कारण असें कीं तो फारच देखणा होता. तो कांहीं मोठासा उण्यापुऱ्या उंचीचा जवान नव्हता हें खास ! परंतु उंची कपड्यांत वावरणारी फ्रँकची मूर्ती सुंदर होती हेंही तितकेंच खरें ! तो

नेहमींच पाईप ओढत असे. तिच्या शय्यागृहांत मंद निळसर प्रकाशांत दारावरचे व खिडक्यावरचे पडदे ओढून घेतले आहेत, आकाशांत क्षितीजांतून पिवळसर संधिप्रकाश उदय पावला आहे. अशावेळीं समोरचा मद्याचा पेला घशाखालीं उतरवत उतरवत पाईपमधून तंबाखूचे सुवासिक लोट बाहेर सोडत आपल्या समोर फ्रॅंक बसला आहे, हें दृश्य आशेला नेहमींच लोभस वाटे.

तिला फ्रॅंक अतोनात आवडत होता. ह्याला दुसरेंही एक कारण होतें. फ्रॅंकपूर्वी आशा ज्यांच्यावर प्रेम करत होती ते सगळे वयाने तिशी पलीकडचे होते. त्यांपैकीं एकदोघेजण तर विधुर होते. बाकीचे विधुर नसले तरी तिच्याप्रमाणें आयुष्यांत पहिली प्रेमनिराशा पदरांत घेऊन कांहीं दिवस विश्रांती घेतल्यानंतर पुन्हा नव्या उल्हासानें ते प्रेमाराधना करूं लागले होते.

फॅंकची गोष्ट तशी नव्हती. विशी ते पंचविशीच्या आंत वावरणारा तो पोरसवदा तरुण होता. श्रीमंत बापाचा मुलगा असल्यानं त्याच्या दुर्दैवानें त्याला जगाचं फारसें ज्ञान झालें नव्हतं. एखाद्या नवख्या इसमाबद्दल प्रथमदर्शनीं त्याचें जें मत होई तें तो सहसा बदलत नसे. तसें असल्यानें त्याच्या स्वभावांत स्वमताबद्दल दुराग्रह निर्माण झाला होता. इतकेंच नव्हे तर तो आपल्या मतांच्या समर्थनासाठीं वेळीं अवेळीं भांडत असे.

थोडक्यांत म्हणजे तो आशेला असा पोरकट भासत होता. परंतु तो असा उथळ नि पोरकट भासत असला तरी त्याचा परिणाम आशेवर अगदीं उलट होई. आपला प्रियकर म्हणून ती त्याच्यावर प्रेम करत असे. त्याचबरोबर फ्रॅंक हा एक हट्टी, चिडखोर मुलगा आपण आपल्या दुधावर वाढवत आहोंत ही सुखाची संवेदना तिच्या हृदयांत सदैव जागृत असे. ह्या दोन्ही भावनांचा समन्वय झाल्यानं सुवासिक कोमट पाण्याचे फवारे चोहींकडून सुटावे त्याप्रमाणें फ्रॅंकवर प्रेमवर्षाव करण्यास आशेनें सुरुवात केली.

फ्रॅंकनें आतांपर्यंत आशेशीं जितकीं भांडणें केलीं होतीं, तितकीं सगळी तिनें सहन केलीं. दरवेळीं मनांतल्या मनांत त्याला सद्‌बुद्धी व शांतवृत्ती देण्याविषयीं परमेश्वराची प्रार्थना केली होती. परतु आतांची गोष्ट तशी नव्हती. कळत न कळत आशेला त्यानें विलक्षण दुखवलें होतं. इतकेंच नव्हे तर, ड्रेसिंग टेबल-

वरील आरशासमोर उभी राहून तोंडावरून पावडरचा हलकासा हात फिरवतांना किंवा आपलें पातळ बदलतांना कांहींशा अरुंद कपाळाकडे व आपल्या बसलेल्या वक्ष:स्थळाकडे पाहून जो प्रश्न तिला पडत असे त्या प्रश्नाचेंच अचूक पण भयंकर उत्तर फ्रँकनें दिलें होतें.

जें तिला ऐकायला नको होतें तें आशेनें ऐकलें. आणि तेंही अशा व्यक्तीच्या तोंडून कीं ज्याच्यावर जीवितांतल्या उत्कट प्रणयाच्या भावना तिने नुकत्याच केंद्रित केल्या होत्या. आशेला तें असह्य झालें. ज्या क्षणाला फ्रँकनें तिच्या कुरूपणावर टीका केली त्याचक्षणाला फ्रँकबद्दल वाटणारे सगळ्याप्रकारचे उत्कट प्रेमभाव आटून गेले. जिच्या मर्मस्थानावर प्रहार झाला आहे अशी स्त्री नात्याचे, प्रीतीचे सगळे पाश किती लवकर तटातट तोडून टाकत असते!

आशा फ्रँकवर फारच चिडली.

परंतु त्याचा उपयोग काय होता?

कारण फ्रँक दुसऱ्या मुलीशीं लग्न करून बसला. त्यानें आशेला बुद्धीपुरस्सर टाळलें होतें. लग्नानंतर त्यानें एकदां त्याचा व त्याच्या सुंदर पत्नीचा फोटो आशेला नजर केला. झालें! आधींच ज्वाला भडकल्या होत्या. तशांत सोसाट्याचे वारे चोहींकडून वाहूं लागले.

आपल्या सौंदर्याबद्दल विलक्षण शंकित झालेल्या आशेनें एक विचार नक्की ठरवला.

आपली सध्यांची अवस्था सोडून लग्न करण्याचें आशेनें ठरवलें. मनांतल्या मनांत दुःखी होण्यापेक्षां एखाद्या राजबिंड्या तरुणाशीं लग्न करून आपण सुखी व्हावें ही कल्पना आशेला मनापासून आवडली. योगायोगाची गोष्ट ही कीं प्रताप शाळेंत येऊन दाखल झाला. त्याच्या दुर्दैवानें आशेनें आपला भावी पती म्हणून त्याच्याकडे पाहण्यास सुरुवात केली.

आशा प्रतापकडे विलक्षण आकर्षित झाली खरी!

अंगावरची भरजरी शाल सावरत दिवसामागून दिवस चालले होते.

परंतु आशा बेचैन होत होती. प्रतापकडे दिवसेंदिवस ती अधिक ओढली जात होती. प्रतापचें भव्य कपाळ, तारुण्याचा दिमाख मिरवणारे त्याचे तेजस्वी

डोळे, त्याचे रेशमी केस तिला मनापासून आवडूं लागले. प्रतापचें खेळकर बोलणें, त्याचा निर्भीड बेफिकीरपणा, दुसऱ्यांना मदत करण्याची त्याची वृत्ती असे त्याचे सगळे सगळे गुण आशेला मन:पूर्वक आवडूं लागले. प्रतापच्या सान्निध्यानें रंगून गेलेला क्षण न् क्षण तिच्या शरिराभोंवतीं तिच्या साडीइतकाच बिलगून रेंगाळतो आहे असें तिला वाटूं लागे.

असेंही जरी होतें तरी आज आशांची राख तिच्या हाताला लागली होती. कां, तें तिला कळलें किंवा नाहीं कुणास ठाऊक परंतु प्रताप आपल्यापासून बुद्धीपुरस्सर दूर राहतो हें तिला समजून चुकलें. तिनें त्याला सिनेमाला येण्या-साठीं, मद्य घेण्यासाठीं, बरोबर जेवण्यासाठीं जितकावेळ आमंत्रण दिलें त्या सगळ्याचवेळीं अती सभ्यपणानें गोड हंसून प्रतापनें नकार दिला.

तिला आधले दिवसाचा प्रकार आठवला.

सायंकाळीं चर्चमधून आशा परस्पर प्रतापच्या खोलीवर गली.

त्यावेळीं तो खुर्चीवर सावकाश धूम्रपान करीत पडला होता. खोलींत हळूं हळूं काळोख घुसत होता तथापि त्याची दाद त्याला नव्हती असें दिसत होतें. स्टूलावर गेल्या तिनचार दिवसांच्या वर्तमानपत्रांच्या अकांचे ढीग पडले होते. परंतु त्यांची घडी मोडलेली दिसत नव्हती. खोली झाडल्यासारखी दिसत नव्हती. प्रतापनें इतक्या लवकर आपला पोषाख बदलून झोंपण्याचा पोषाख केला होता त्याचेंही आशेला मोठेंच आश्चर्य वाटलें.

विस्मयानें ती प्रतापला म्हणाली,

'प्रताप, कसचा विचार करताहांत?'

'छे, छे, कुठला? कसचा?'

गोंधळून प्रताप म्हणाला.

आशा हंसली. तिनें बटन दाबलें. तेव्हां तर प्रतापच्या चर्येवर धांदल अन् काळजी ह्याच्या रेषा स्पष्टपणें उमटल्या आहेत असें तिला वाटलें. तो म्हणाला,

'बसा ना.'

'हो. बसतें मी. तुमची प्रकृती बरी नाहीं कां?'

‘ ठीक आहे कीं. बरं, काय घेणार तुम्ही. चहा कीं थंडगार ड्रींक? ’

‘ डोन्ट यू वरी प्रताप. मी नुकताच चहा घेऊन आलें.’

‘ खरं ?’

‘अगदीं खरं ! अन् खोटं मी काय म्हणून सांगूं बाई ?’

हें म्हणतांना आशेनें मीवर मुद्दाम जोर दिला, तें प्रतापच्या ध्यानांत आल्याशिवाय राहिलें नाहीं असें स्पष्ट दिसत होतें.

मग आशा म्हणाली.

‘ बरं, कपडे बदला. ’

‘ कां ?’ आश्चर्यानें प्रतापनें विचारलें.

‘ चला आमच्याकडे. जेऊंही आपण तिथंच. पत्ते खेळूं अन् थोडीफार मजा करूं. चला, चला मग. उशीर होईल नाहीं तर.’

मनगटावर घड्याळाकडे आशेनें पाहिलें.

प्रतापनें आशेकडे पाहिलें. त्या लाघवी आणि धीट मुलीला फारसें कडू उत्तर देण्याचें टाळावें ही दक्षता घेऊन तो तिला म्हणाला,

‘ हे पहा आशाराणी, मला शक्य नाहीं तुमच्याकडे येणं. एकतर माझ्याकडे आता माझी एक मैत्रिण यायची आहे. तेव्हां हा आग्रह मला तुम्ही न करणं बरं.’

प्रतापचा इतका स्पष्ट नकार आशेला आवडला नाहीं. ती निमूटपणें उठली व गाडींत येऊन बसली.

प्रतापला आपण आवडत नाहीं हें आशेला स्पष्ट समजून आलें. त्याच्याशीं विवाहबद्ध होण्याची तिची सगळीं सुखस्वप्नं धुळीला मिळालीं. ज्या गुलाबी रंगाच्या धाग्यांनीं विणलेल्या जाळ्यांत कांहीं काळ ती अडकून पडली तें जाळें तुटून गेलें. तिच्या कातडीवर त्या धाग्यांचे सांवळे करकोचे तेवढे कायम राहिले अन् त्यावरून हात फिरवत फिरवत आपल्या जवळचा प्रत्येक अश्रू गाळणें एवढेंच काय तें आपल्या हातीं राहिलें आहे हेंही तिला कळून चुकलें

प्रतापनें आपल्याला टाळण्याचें कारण आशेला स्पष्ट समजलें होतें. तो रेखेच्या प्रेमपाशांत सांपडला आहे हें उघड उघड दिसत होतें. त्याच्या सारख्या

उमद्या जवानानें दयेसारख्या देखण्या पोरीसाठीं आपल्याला डावलावें ही गोष्ट अगदीं नैसर्गिक आहे हेंही तिला मनांत समजत होतें. मात्र येथें तिला वारंवार वाटत असे, ही निसर्गाची चूक असेल कदाचित् परंतु येवढ्या एका चुकीनें आपल्या जीवितांत काय तीव्र मानहानी होऊन राहिली आहे. आपल्या सगळ्या दुर्दैवाचा पाढा फक्त एकाच शब्दांत आहे.

कुरूप... . ...

ती फार वैतागून गली. आणि त्या वैतागाच्या भरांत तिनें एक विचित्र निश्चय ठरवला. हळूं हळूं तिनें तो निश्चय अंमलांत आणण्यास सुरुवात केली.

घड्याळांत चाराचे टोले पडले.

रस्त्यावरून रतीब घालणारे गवळी सायकलवरून जायला सुरुवात झाली. तिच्या बाजूच्या बंगल्यांत एक वृद्ध पेन्शनर सकाळीं चारला फिरायला जात असे त्याचेंही रस्त्यावरून अस्पष्ट खोकळणें तिला ऐकायला आलें. मग आशेनें विचारानें थकून गेलेलें व झोपेनें आळसटून गेलेलें आपलें शरीर बिछान्यावर टाकलें.

त्यानंतर आशेला लवकरच झोंप लागली.

# १४

# निश्चयाची पूर्ती

दुसरे दिवशीं आशा झोंपून उठली तेव्हां दिवस चांगलाच वर आला होता.

सगळी झोंप बऱ्यावाईट स्वप्नानें भरली होती म्हणून कीं काय, परंतु झोंपेतून उठताच तिचे डोळे कांहींसे तेलकट दिसत होते. कदाचित् हा रात्रीच्या अतिरिक्त मद्यपानाचाही परिणाम असूं शकेल. झोंपेतून उठतांच आशेनें प्रथम चहा घेतला. व अपुऱ्या झोंपेनें अधिकच येऊं पाहणारी ग्लानी काढून टाकण्यासाठीं म्हणून ती लगबगीनें स्नानगृहाकडे गेली. ब्लाऊज, स्तनावरची कांचोळी अन् पातळ क्रमाक्रमानें उतरवून तिनें खुंटीवर अडकवले व तोटी फिरवून नाजूक गुदगुल्या करणारे थंड पाण्याचे तुषार सगळ्या शरीरावर झेलले.

ती बराच वेळ स्नानगृहांत होती.

स्नान आटोपून आशा आली तेव्हां ती किती तरी उल्हासित दिसत होती. परंतु तो उल्हास निर्भेळ नव्हता हें मात्र खास! तिच्या उन्मत्त वृत्तीचे पाय कसल्यातरी सूक्ष्म तंतूंनीं ओढून धरले आहेत असें स्पष्टपणें दिसत होतें.

कितीतरी वेळ ती निश्चल बसून होती.

सुमारें बारा वाचण्याच्या सुमाराला तिनें आपल्या ड्रायव्हरला हांक मारली.

' बाबुलाल, बाबुलाऽल '.

घाईघाईनें बाबुलाल जिना चढून वर आला. वाळण्यासाठीं आपला केशपाश तिनें सैल सोडला होता पदराचें टोंक पुढच्या दातांत तिनें धरलें होतें. मधून मधून ती आपलें कपाळ तळहातानें दाबत असे. जणूं काय, तिचें मस्तक कसल्यातरी विचारानें वारंवार तापलें जाई व त्याला तिच्या नाजूक तळहाताचा स्पर्श सुखावा वाटे.

बाबुलालच्या येण्याची तिला बराच वेळपर्यंत चाहूल नव्हती. त्याच्याकडे लक्ष जाऊन तिनें त्याला विचारलें,

' काय रे बाबुलाल ? '

मग तिचें तिलाच आठवून हंसायला आलें.

तिनें त्याला आठ वाजतां प्रतापला बोलावून आणायला सांगितलें. तिला त्याच्याशीं कांहीं महत्वाचें काम होतें. जातां जातां टपालाच्या पेटींत टाकण्यासाठीं तिनें त्याला एक पत्र दिलें. आधले दिवशीं रात्रीं लिहून ठेवलेलें तें पत्र होतें.

' —अन् हे पहा. वेळेवर जा हं. '

ह्याप्रमाणें आशेनें त्याला बजावूनहि दिलें.

तो रविवारचा दिवस होता.

डिसेंबर महिन्याचे दिवस. तशांत रविवार ! आधींच डिसेंबरचा महिना म्हणजे मुंबईत कोण उल्हास नी धांदल असते ! दिवाळी निघून गेली असते. तिची छाया रेंगाळत असते. समोर दिसणाऱ्या नाताळच्या सुट्टीच्या आशेनें साधारण मनुष्याची आपल्या जीवनांतील वाटचाल घाईघाईनें होत असते सागरी हवामानाच्या त्या शहरांत गुलाबी थंडीचा मजेदार अनुभव घेत घेत सगळे लोक गरम कपड्यांत वावरत असतात. त्या सगळया विराट नगरींत दिसून येणारा उल्हास पाहिला म्हणजे सोमरसाचे घुटके घेऊन ती नगरीच्या नगरीच उन्मत्त तर झाली नाहीं ना असा संशय येत असतो.

आणि तशांत तो रविवारचा दिवस होता.

प्रतापची वाट पाहत आशा उभी होती. मोटार बंगल्याच्या आवारांत शिरल्याचा आवाज ऐकूं आला. मग कां, कुणास ठाऊक आशेची छाती धडधड करूं लागली.

जिना चढून प्रताप वर आला. तेव्हां हस्तांदोलनासाठीं हात पुढें करून आशा म्हणाली,

' गुड् इव्हिनींग.'

प्रतापनें हस्तांदोलन केलें.

' गुड् इव्हिनींग. '

काय देखणा दिसत होता प्रताप तिला ! पांढरा स्वच्छ परिटघडीचा पायजमा, पातळ उलनचा शर्ट व शर्टला शोभून दिसणारा उलनचाच कोट असे साधेच त्याचे कपडे होते. त्याच्या जाडजूड, गोऱ्यापान व केसाळलेल्या मनगटावर सोन्याची सैल साखळी व छोटें घड्याळ मोठें शोभून दिसत होतें. भुरकट शर्टची कॉलर कोटाच्या कॉलरवर टाकली होती. कॉलरची रुंद पट्टी त्याच्या मानेवर खुलून उठत होती.

प्रताप कोचावर बसला. खिडकीवरचा पडदा आशेनें ओढून घेतला. नंतर ती प्रतापजवळ कोचावर बसली.

' ड्रायव्हर आला तेव्हां तुम्ही फारशा महत्वाच्या कामांत तर नव्हता ना?'

तो प्रश्न प्रतापला रुचला नाहीं. तो प्रश्न तिनें कांहीं विशिष्ट हेतूनें खोचून तर विचारला नसावा ना असा त्याला संशय आला. म्हणून कडवट शब्दांत त्यानें तिलाच विचारलें,

' कां ?'

' मला भीति वाटत होती ती अशी कीं, तुम्हांला मी आग्रहाचं आमन्त्रण पाठवावं नि नेमके त्याचवेळीं तुम्ही कांहीं महत्वाच्या कामांत गुंतले असावेत. '

आपल्या प्रश्नांतील कटुता आशेला कळली व त्यानं तिचा गोंधळ उडाला हें प्रतापला समजलें. मग तिला शांत करण्यासाठीं तो तिच्याजवळ सरकला त्यावेळीं त्याच्या डाव्या मांडीचा जो स्पर्श झाला तो तिला मोठा सुखाचा वाटला.

प्रताप म्हणाला,

' मी कामांत तर नव्हतोच पण उलट वेळ चांगल्या रीतीनं कसा घालवतां येईल याचा मी मनांत विचारच करीत होतों. तुमचा निरोप आला तेव्हां मला मनापासून आनंद झाला. '

' खरं ? '

' हो, तर. खरं, अगदीं खरं. '

आशा फार आनंदित झाली. कानावरचे केसांचे फुगोटे तिनें हातानें चांचपल्यासारखे केले. किंचित् बाजूला घसरलेलें वज्याळ मनगटावरच्या मध्यावर तिनें नीट बसवलें.

नंतर खालीं पाहूनच प्रतापला ती म्हणाली,

' जेवण झालं तुमचं ? '

' नाहीं. '

' मग या ना जेवायला.'

कारण नसतांनाही प्रताप गोंधळला. एरव्हीची गोष्ट असती तर आशेला त्यानें स्पष्ट शद्बांत नकार दिला असता. परतु आज तो वेगळयाच मनःस्थितींत होता. काल रात्रींच त्याची नि दयेची आणभाक झाली होती. आज सृष्टीला सचेतन करणाऱ्या सूर्यकिरणांत माणसाला धुंद करणारें तेज आहे असा भास प्रतापला झाला होता. त्याच्या जीवनांत सुखाचा ऐन बहर फुलला असल्यानें एवढ्या तेवढ्यासाठीं कुणाला दुखवावें ही कल्पनाच मुळीं त्याला आवडेना !

म्हणून फारसे आढेवेढे न घेतां तो म्हणाला,

' तुमचा विशेष आग्रह असेल तर मलाही नाहीं म्हणायचं कांहींच कारण नाहीं.'

आशा आनंदित झाली. घाईघाईनें तिनें जेवण्याची व्यवस्था केली. मग टेबलवर ते दोघेही जेवावयास बसले

जेवणाचा प्रकार साधाच होता. आशा मांसाहारी होती आणि प्रतापला मांसाहाराची संवय अशी जरी नव्हती, तरी तो प्रकार त्याला निषिद्ध असाही नव्हता. मधून मधून मांसाहार घेण्याची त्याला नागपूरला कॉलेजांत असतांनाच

संवय लागली होती. म्हणून आतां आशेनें त्याच्यासमोर मांडलेल्या मोठमोठ्या बशांतून भात, पोळ्या, मामळी व पुडींग असें पचायला हलकें परंतु रुचकर पदार्थ आले तेव्हां प्रतापनें त्यावर यथास्थित ताव मारला. जेवतांना मग प्रतापनें विचारसुद्धां केला नाहीं कीं स्वयंपाकाचं दिवाळं वाजण्याइतका हा आपला आधाशीपणा कदाचित् आशेला विचित्र दिसेल !

परंतु त्याला प्रतापचा इलाज नव्हता.

त्याला अत्यानंद झाला होता. आणि त्याची आनंदी वृत्ती नसानसांतून उचंबळत होती.

जेवण आटोपल्यानंतर प्रताप टॉवेलनें हात पुसत कोचावर येऊन बसला.

आशा त्याच्याजवळ येऊन बाजूला बसली. क्षणभर तिनें प्रतापकडे पाहिलें. त्याच्या मनगटावरील दुहेरी कफाची गुंडी सुटली होती ती तिनें लावली.

प्रतापचें लक्ष तिच्या या सलगीकडे होतें तथापि तो बोलला नाहीं.

‘ प्रताप.’

तरी प्रताप बोलला नाहीं.

‘ प्रताप.’

‘ काय ?’

‘ व्हिस्की घ्याल थोडी. ’

‘ अं, हं.’

‘ एकदाच फक्त.’

‘ घेतली होती मी एकदां. ’

‘ अं, हं. माझ्यासाठी एकदांच मी म्हणतें. ’

‘ असं. बरं चालेल. हें पहा फक्त एकच घोट.’

‘ ठीक आहे.’

मग मोठ्या घाईनें आशेनें कपाट उघडलं. सोड्याची बाटली फोडली व दोन व्हिस्कीचे पेले तयार केले.

पेला रिकामा करून प्रतापनें तो टेबलवर ठेवला.

घड्याळांत दहाचे टोले पडले.

प्रतापनें अस्वस्थपणें घड्याळाकडे पाहिलें व आशेला तो म्हणाला, ‘ बराय् , येतों मी.’

‘ मीही येतें. असं करूं या मी माझी गाडी घेतें. पण एक गोष्ट हं.......’

‘ काय ?’

‘ तुमच्या खोलीकडे जाईपर्यंत चाकाशी तुम्हाला बसावं लागेल. येतांना मग मी बसेन.’

‘ कां, बरं. ड्रायव्हर कुठें गेला ?’

‘ घरीं गेला तो.’

‘ मग टॅक्सी करून जाऊं या कीं.’

‘ नको टॅक्सी मला विशेष आवडत नाहीं. नको राहूंच द्या तें.’

‘ ठीक आहे. तुमची मर्जी.’

जिना उतरून ते दोघेही खालीं आले.

प्रताप मग चाकाशी बसला. गाडी पूर्ण वेगानें जाऊं लागली.

प्रतापजवळच आशा बसली होती. मंद काळोखांतून ते चालले होते. गाडींत दिवा विझवला होता. प्रतापच्या ओठांतील सिगारेटचे लालबुंद टोंक प्रकाशत होतें. वारा झुळुझुळु वाहत होता. मोटारींत घोटाळणारा वारा आशेच्या मऊ कुंतलांना लावलेल्या तेलाच्या सुवासासाठीं नुसता हपापून गेल्यामारखा वाटत होता.

चाकावर ठेवलेल्या प्रतापच्या डाव्या हाताचें आशेनें वांकून चुंबन घेतलें. तेव्हां प्रताप ओरडून म्हणाला,

‘ आशा ! ’

परंतु आशा भ्याली नाहीं. ती प्रतापच्या जास्तच जवळ सरकली. इतकी कीं त्याच्या मांडीला तिच्या मांडीचा अगदीं निकटचा स्पर्श झाला. त्याच्या डाव्या कुशीशी ती बिलगली त्यामुळें त्याच्या डाव्या खांद्याला तिच्या हनुवटीचा स्पर्श झाला त्यानें प्रताप थरारून गेला.

प्रतापला तें आवडलें नाहीं.

खोल आवाजांत आशा म्हणाली.

'प्रताप......'

जागच्या जागींच अस्वस्थपणानें प्रतापनें चळवाचळव केली.

आशा पुढें म्हणाली,

'प्रताप, तुम्हांला कल्पना यायची नाहीं अन् मला तें वर्णन करून सांगतां पण येत नाहीं. तुमच्यासाठीं माझा जीव नुसता झुरून राहिला आहे. माझा स्वीकार करा. प्रताप... नाहींतर, नाहीतर...'

तिच्याच्यानें पुढें बोलवलें गेलें नाहीं. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा मळमळून बाहेर आल्या.

प्रतापचा स्वभावच मुळी असा होता कीं ज्या डोळ्यांत त्याला अश्रुधारा खळखळतांना दिसत तेथें ते अश्रु पुसण्यासाठीं त्याचे कांपरे ओठ उतावीळ होऊन जात.

आतांही त्यानें असेंच केले

त्याच्या स्कंधावर आशेनें मान टेकवली होती. तिच्या अरुंद कपाळाचें त्यानें आपल्या ओठांच्या कोपऱ्यानें चुंबन घेतलें.

त्याचा स्पर्श आशेला मोठा सुखावह वाटला.

प्रताप मग तिला म्हणाला,

'तुमचं हृदय नि भावना मला समजत नाहींत असं कां आहे आशाराणी. परंतु मोठ्या नाईलाजानं मला स्पष्ट सांगावं लागतं आहे तुम्हांला...'

'काय?' घाबरून आशा म्हणाली.

'मला तुमच्यावर प्रेम करतां येणं शक्य नाहीं.'

'कां पण?'

प्रताप स्तब्ध होता.

'कां पण? मी दिसायला चांगली नाहीं म्हणून?'

त्यांवर प्रताप किंचित् हंसला व म्हणाला,

'तुम्ही त्याबद्दल विचारूं नये हें चांगलं.'

प्रताप म्हणाला एका अर्थानें व आशेनें तें घेतलें दुसऱ्या अर्थानें.

तिला प्रतापच्या नकाराचा अर्थ स्पष्टपणें समजला. त्याबद्दल तिला आश्चर्य तर वाटलेंच नाहीं उलट समाधानाचा संथ निश्वास तिनें सोडला. प्रताप काय म्हणेल याची कल्पना तिला जवळ जवळ होतीच. फ्रँकनें उघड्या नागड्या शद्बांत तिच्या कुरुपणाची विटंबना केली होती तेव्हांच सगळया पुरुष जातीचा अंदाज तिला आला होता. प्रताप त्याला अपवादात्मक असेल असें तिला कधींच वाटलें नव्हतें. अन् आतां तर तसा प्रत्यय तिला आलाच होता.

त्या विचारांत ती थोडीशी बाजूला सरकली.

वेग दाखविणारा काटा पंचेचाळीसवर होता. प्रताप उन्मत्त शीळ घालून बेफिकीरपणानें गाडी हांकलत होता. बाजूची माडाचीं झाडें सरसर अशी वेगानें सरकत होती. .

आशेचे डोळे क्षणभर निश्चयानें चमकले. तिचे ओठ थरथर कापूं लागले. दोन्ही हातांनीं तिनें मोटारचें चाक डावीकडे वेगानें फिरवलें.

प्रताप गोंधळून गेला. त्याचे चाकावरचे हात सुटुन गेले. मोटारला डाव्या बाजूनें जबरदस्त झिकोला बसला. धाड्दिशी मोटार कशावर तरी आदळली असावी......

त्यानंतर प्रताप बेशुद्ध झाला.

१५

# दाट काळोख

त्यानंतर सुमारें चार दिवसानंतरची गोष्ट! फोर्टमधील महम्मद मंझील-समोर सकाळीं साडेआठच्या सुमाराला दया बस्‌मधून उतरली.

साडे आठ वाजले होते खरे, परंतु त्या गजबजलेल्या रस्त्यावर तुरळक-सुद्धां सूर्यकिरणांचा प्रवेश झाला नव्हता त्यामुळें रस्त्यावरची गर्दी, धांवपळ, रहदारी व बाजूच्या भव्य दुकानांतून विजेच्या दिव्यांच्या झगझगीत प्रकाशांत चाललेला सगळा व्यवहार अम्मळ उदास वाटे.

लिफ्ट्‌मधून दया चवथ्या मजल्यावर गेली. दाराजवळ भिंतीवर लावलेल्या बॅरिस्टर मुजुमदारच्या छोटेखानी फलकावर आपली ओझरती नजर टाकून बाहेर उभ्या असलेल्या चपराशाला विचारलें,

‘काय रे काका आहेत कां?’

‘हां, ताईसाहेब.’

त्यानें मोठ्या आदबीनें दारावरचा पडदा उचलला.

दोन दालनें ओलांडून दया ज्यावेळीं बॅरिस्टरसाहेबांच्या ऑफिसांत गेली तेव्हां ते आपल्या कामांत मग्न झालेले दिसले. ते खालीं पाहून लिहीत होते. त्यांचे लांबरुंद टेबल कामाच्या कागदपत्रानें झांकून गेलें होतें. जवळच त्यांचा कारकून अदबीनें उभा होता. दयेनें पाहिलें तो त्यांचा कारकून एखाद्या पुतळ्यासारखा निश्चल उभा होता. अन् तो श्वासोश्वास करत होता तोही जपूनच !

बॅरिस्टर मुजुमदार व कॅप्टनमंत्री मोठे जिवलग स्नेही होते. आपापल्या व्यवसायांत दोघेहि पहिल्या प्रतीचे निष्णात होते. एवढा एक साधारण गुण सोडला तर त्या दोघांचा स्नेह कायम टिकावा ह्याचें कुणालाही कोडेंच पडे ! कारण बॅरिस्टरसाहेब जितके निर्व्यसनी तितकेच कॅप्टन मंत्री अट्टल व्यसनी ! बॅरिस्टरसाहेब जितके सारासार विचार करणारे तितकेच कॅप्टनसाहेब बेछूट व स्वैर. एक पोलादी कांबेप्रमाणें सरळ तर दुसरा झाडाच्या बारक्या फांदीप्रमाणें वांकडातिकडा !

ज्यावेळीं अशा भिन्न प्रकृतीच्या माणसांचा स्नेह समाजांत आढळून येतो, त्यावेळीं मनाला मोठें आश्चर्य वाटतें. परंतु त्यांत खरी गोष्ट अशी असते कीं बॅरिस्टर मुजुमदारसारखा सज्जन मनुष्य असल्या उनाड स्नेहाची काळजी घेऊन तो वाढवत असतो.

दयेला हें माहीत होतें आणि म्हणूनच तिला बॅरिस्टरसाहेबांबद्दल अतोनात आदर होता.

तिच्या काकांच लिहिणें आटोपल्यानंतर त्यांनीं कारकुनाला कामाचें कांहीं कागदपत्र दिले व दुसरे कांहीं कागदपत्र आणावयास सांगितलें.

इतक्यांत बाजूला उभी असलेली दया त्यांच्या दृष्टीला पडली.

ज्यावेळीं तिच्या काकांनीं तिच्याकडे आश्चर्याचा एक कटाक्ष टाकला त्यावेळीं त्यांचे पिंगट रंगाचे डोळे क्षणमात्र चमकले.

बॅरिस्टर मुजुमदार वयानें तिच्या पपा एवढेच होते. वर्णानें ते काळेसावळे येतलि. त्यांचें कपाळ भव्य असून बाजूची तुळतुळीत कानशिलें डोक्यावरील रुपेरी केसांत खोल शिरल्यानें त्यांचें कपाळ अधिकच उन्नत व भव्य दिसे. त्यांचे डोळे पिंगट होते. एखादवेळ कामाचा असह्य ताण पडल्यानें त्यांचे ते

पिंगट डोळे मदीर दिसत. थोडक्यांत म्हणजे, त्यांचे भव्य कपाळ व पिंगट डोळे पाहणाऱ्यावर अनुकूल छाप पाडत. त्यांच्या सगळया अशिलांना बॅरिस्टर-साहेबांच्या कौशल्याबद्दल विश्वास वाटत असे.

ते तिला म्हणाले,

'कोण ताई अन् तूं अशी उभी काय म्हणून ग ? बैस कीं अशी.'

मग ते आपल्या कारकुनाला म्हणाले,

'हे पहा जरा वेळानं कागदपत्र आणा हं. त्याप्रमाणं मी सूचना देईन तुम्हांला.'

नंतर दयेकडे वळून ते म्हणाले,

'हं बोल. कसं काय तुझं ?'

दयेनें कारकून गेल्याची खात्री करून घेतली. एकवार काकाकडे पाहिलें. काय बोलावें ते तिला सुचेना. टेबलाच्या कडेवर तळहाताच्या ओंजळींत आपलें तोंड झांकून ती रडूं लागली.

बॅरिस्टरसाहेबांना हें नवीन नव्हतें. त्यांच्या बंगल्यावर गेल्यानंतर ते तिच्याशी बराच वेळ बोलत असत. अशा वेळीं चुकून आधांत तिच्या आईचा उल्लेख केला कीं तिचे डोळे पाण्यानें डबडबून येत. एखादवेळ जेव्हां वात्सल्यानें तिच्या पाठीवर हात ठेऊन ते ' बेटा दया ' असें म्हणत त्यावेळीं तिला दुःखाचा नि शोकाचा आवेग आवरेनासा होऊन तिला रडायला येई.

ती अशी रडूं लागली कीं मग बॅरिस्टरसाहेबांनाही आपले अश्रू आवरत नसत. त्यांना मूलबाळ असें झालेंच नव्हतें. कॅप्टन मंत्रीसारख्या वृत्तीन नादान असलेल्या माणसाच्या लहरीवर दयेसारख्या चांगल्या मुलीच आयुष्य नाचलं जाऊं नये असें त्यांना फार फार वाटे. परंतु त्याला त्यांचा उपाय नव्हता. अन् ही गोष्ट आपल्या हातची नाहीं हें कळूनसुद्धां तें शल्य त्यांना सारखें बोंचत राही.

दया त्यांच्याजवळ अश्रूसिंचन करत असे हें खरें ! तथापि यापूर्वी ती अशी कधीं ऑफिसमध्यें येऊन रडली नव्हती. कांहींतरी विचित्र कारणानें तिचा मनस्ताप असह्य झाला असावा असें बॅरिस्टरसाहेबांना वाटलें.

म्हणून तिला कांहीं वेळ शांत रडूं द्यायचें हें ठरवून ते आंतल्या खोलींत गेले. स्वतःचे डोळे व गाल स्वच्छ पुसून त्यांनीं नाक शिंकरलें.

ते पुन्हा आपल्या खुर्चीशी आले तेव्हां दयेनं डोळे स्वच्छ पुसून कोरडे केले होते. आपली नजर तिनें कुठेंतरी शून्यांत लावली होती.

मग ते तिला म्हणाले,

'आंत जाऊन तोंड धुऊन घे स्वच्छ.'

दया आंत गेल्यानंतर त्यांनी कारकुनाला हांक मारून सांगितलें,

'हें पहा माझ्या थर्मासमधला चहा थोडा ताईसाठीं घेऊन या.'

दया आली. तिनं चहा घेतला. व मग जें काय तिला बोलायचें होतें तें कसें बोलावें ह्याचा ती मनांतल्या मनांत विचार करूं लागली. बराच वेळ ओठ मुरडून तिनें दाताखालीं दाबून धरला.

मग ती म्हणाली,

'काका. मला तुमची मदत पाहिजे आहे. तुमची मदत अशा स्वरूपाची आहे कीं ती न दिलीत तर माझ्या सर्वस्वाचा त्यांत घात होईल. अन् दिलीत तर पपांशीं जन्माचं वैर तुम्हांला घ्यावं लागेल......

'अस्सं......'

'मग मला मदत करण्याचं वचन द्याल?'

तेव्हां क्षणभर दयेकडे निरखून पाहून काका म्हणाले,

'वेडे, हा प्रश्न विचारण्याच्या तरी योग्यतेचा आहे कां?'

कृतज्ञतेनें दयेनें आपल्या काकाकडे पाहिलें.

'तुम्हाला माहीत आहेच कीं मी झालें अन् आई गेली. मला राहून राहून असं वाईट वाटतं त्याचं. मी नुक्तंच एकाशीं लग्नाचं ठरवलं अन्......' येथें ती क्षणभर थांबली.

'...राहून राहून मला असं वाटतं कीं ज्यांच्याशीं म्हणून माझा संबंध यावा त्याला मी एखाद्या शापाप्रमाणें बाधून त्याच्या जीविताचा सत्यानाशच व्हावा कां......'

तिचा घसा पुन्हा दाटून आला. तिचे डोळेही पाण्यानें डबडबले. तथापि तो दुःखावेग मोठ्या प्रयासानें दाबून तिनें पुढें सांगायला सुरुवात केली,

'नुकताच तीन चार दिवसापूर्वी एका रात्रीं दादर माटुंगा रस्त्यावर झालेला अपघात तुम्हांला माहीत असेलच. मिस् आशा अन् प्रताप हे दोघेही माझ्या चांगल्याच परिचयाच आहेत. त्यांच्यापैकीं प्रताप म्हणून जे मी म्हणाले त्यांच्याशीं लग्न करायचं ठरवलं होतं. अन तो निश्चय अजापही कायम आहे.'

दयेच्या शब्दागणिक तिच्या काकाच्या मुद्रेवरील आश्चर्याच्या सूक्ष्म रेषा अधिकाधिक स्पष्ट होऊं लागल्या. शेवटल्या वाक्याबरोबर ते अर्धवट ओरडूनच म्हणाले,

'म्हणजे ताई ! काय सांगतेस तूं हें ! त्या प्रतापशीं तूं लग्न करणार ?'

'होय. माझ्या सर्वस्वाचं मागणं म्हणून मी फक्त एक विनंति तुम्हांला करणार आहे. तुम्ही मनांत आणल तरच त्याना वाचवणं शक्य आहे. नाहीं तर...नाहीं तर ..'

पुन्हा दयेचे डोळे डबडबून आले.

बॅरिस्टरसाहेबांनीं शून्यांत नजर रोखली.

मनाची मोठी असहाय्य स्थिती व्हावी असा भाव त्यांच्या मुद्रेवर दिसूं लागला. त्यांचे पिंगट बसके डोळे अधिकच आकुंचित झाले व त्यांचा सावळा रंग काळाठिक्कर पडला. अट्टल बदमाषांमध्यें नि ज्यांच्या आयुष्यावर कृष्ण कर्मांचे ओघळ सारखे वाहत आहेत अशा लोकांमध्यें त्यांना सारखे वावरावें लागत असल्यानें साध्यासुध्या गोष्टींनीं त्यांची हिम्मत खचत नसे. परंतु आपलेपणाचा धर्मच असा विचित्र आहे कीं दुरून मेघगर्जना जरी ऐकूं आली तरी पावसाच्या धारा कोसळून आपली दुनिया जलबंब होते असा भास व्हावा ! असें असल्यानें त्यांच्या लाडक्या ताईवर प्रेमभंगाची विचित्र आपत्ति ओढवलेली पाहतांच ते धास्तावून गेले.

आपल्या रुपेरी केसांतून त्यांनीं अस्वस्थपणें बोटें फिरवलीं. स्टॅंडवरील फौंटनपेन उचलून त्यांनीं ती कपाळावर आपटल्यासारखी केली.

कांहीं क्षणानंतर ते म्हणाले,

'ताई, तुझ्यासाठीं मला काय करतां येण्यासारखं आहे हें तूर्त मला सांगतां येत नाहीं. कारण, कारण......पण मला तुला सगळी हकीकत प्रथम सांगणं जरूरीचं आहे.'

त्यानंतर तिच्या काकांनीं हकीगत सांगायला सुरवात केली.

काल सकाळीं ते असेच कामाचे कागदपत्र पाहत बसले असतां एक पोर-सवदा मुलगी तेथें आली. तिच्या नांवाची भेटपत्रिका अगोदरच आंत आल्यानें ती त्यांचे नागपूरचे परलोकवासी स्नेही ॲडव्होकेट संभाजीरावांची सून आहे हें कळावयास फारसा उशीर लागला नाहीं. परंतु ती विधवा आहे हें त्यांना कळलें तेव्हां तें त्यांना मोठें आश्चर्यकारक वाटलें कारण उल्हासच्या मृत्यूची खबर त्यांना मिळाली नव्हती.

त्यांनीं तिच्या अभिवादाचा स्वीकार केला. खुर्चीकडे अंगुली निदेश करून क्षण, दोन क्षण ते पुन्हा टेबलवरच्या कागदांत मग्न झाले.

त्यांतून ते मोकळे होतांच तिला म्हणाले,

'तुला माहित नसल परंतु तुझे श्वशुर माझे चांगले स्नेही होते.

'होय. मला तें माहीत आहे.

त्यानंतर ती गप्प बसली. बॅरिस्टरसाहेबांना कोणता विषय काढावा तें समजलें नाहीं. नेहमींच स्त्रियांच्या समोर बोलतांना त्यांना विषयांची उणीव भासत असे. आतांही त्याना ती तशीच वाटूं लागली. मग ते स्वतःवर मनांतल्या मनांत चिडले.

परंतु संध्येनें त्यांची त्यांतून सुटका केली.

ती म्हणाली,

'काल संध्याकाळीं एक अपघात झाल्याचं मला नागपूरला वर्तमान-पत्रांतून कळलं. हें पहा.'

असें म्हणून संध्येनें वर्तमानपत्राचा चुरगळलेला अंक त्यांना दिला. त्यांनी तो टेबलवर नीट केला नि बातमी वाचण्यास सुरुवात केली.

## —: रहस्यमय अपघात :—

( आमच्या खास बातमीदाराकडून )

काल रात्री अदाजे दहा वाजण्याच्या सुमारास एक तरुण स्त्री दादर माटुंगा रस्त्यावर मरून पडलेली आढळली. ही तरुणी म्हणजे अध्यापनासाठीं प्रसिद्ध असलेली मिस् आशा नांवाची एका ख्रिश्चन हायस्कूलची प्रिंसीपाल आहे.

ही आशा ज्या गाडींत चिरडून मेली असं कळतें त्याच गाडी शेजारीं तिच्याच शाळेंतील एक तरुण मास्तर बेशुद्धावस्थेंत आढळला. पोलिसनें मिस् आशेचें प्रेत आपल्या ताब्यांत घेतलें असून त्या तरुणावर आपल्या देखरेखीखालीं औषधोपचार सुरू केले आहेत.

आतां ह्या मृत्युमागें कोणतें रहस्य दडलें तें पहायचें !

त्यानंतर अखेरची बातमी म्हणून एक बातमी छापली होती. त्यांत प्रताप सुमारें दोन तासानंतर शुद्धीवर आला असून पोलिसनें त्याला अटक केल्याचें समजतें असेंही छापलें होतें.

तें सगळें वाचून झाल्यानंतर ते म्हणाले,

'बरं मग ?'

तेव्हां आपली गंभीर मुद्रा यत्किंचित्‌ही विचलीत न होऊं देतां संध्या म्हणाली,

'प्रथम प्रतापरावांना अटकेंतून सोडवायचं. त्यासाठीं मी जामीन रहायला तयार आहे रोख रक्कम जितकी भरावी लागेल तितकी मी हजर करीन अन् दुसरं म्हणजे त्यांचा बचाव करायचा.'

त्यानंतर ती जायला निघाली. दाराजवळून परतून कांपऱ्या ओठानें ती त्यांना म्हणाली,

'आपल्याजवळ मी जास्त काय सांगायचं परंतु प्रताप जर सुटले नाहींत......'

संध्येच्या गालावरून अश्रू घळघळ वाहूं लागले.

तिला शांत होऊं देऊन ते म्हणाले,

'माझ्यावर विश्वास ठेव तूं.'

त्यानंतर संध्या तेथून गेली.

लगेच ते आपल्या कामाला लागले.

प्रथम त्यांनीं प्रतापची जामिनीवर सुटका करून घेतली. नंतर त्यांनीं पोस्टमॉर्टमचा रिपोर्ट पाहिला. आणि येथेंच त्यांनीं हात टेकले. कधीही कुंठित न होणाऱ्या त्यांच्या बुद्धीचे पंख उपटून टाकल्याप्रमाणें ती दुबळी झाली.

(स्त्रियांच्या पोस्टमॉर्टमचे वेळीं प्रत्येकदां कॅप्टन पंडितांना बोलावण्यांत येई. याही वेळीं त्यांना पाचारण करण्यांत आलें होतें.) पोस्टमॉर्टमचे वेळीं मिस् आशा गरोदर असल्याचें उघडकीला आलें होतें. अन् पोलिसच्या मतें ही गोष्ट सदर मृत्यु अपघात आहे किंवा खून आहे हें पडताळून घेण्यासाठीं अवश्य लक्षांत घेण्यासारखी होती.

हें सगळें ऐकून दयेनें आश्चर्यानें विचारलें,

'खरं म्हणतां काका!'

त्यावेळीं तिच्या नाजुक नाकपुड्या विस्फारल्या, अधरोष्ठ किंचित् हलला अन् आपले रडून रडून सुजलेले टपोरे डोळे तिनें बॅरिस्टरसाहेबांच्या मुखाकडे लावले.

बॅरिस्टरसाहेबांना काय बोलावें तें सुचेना!

'अशक्य, अशक्य, काका असं असणं शक्यच नाहीं. माझ्यावर विश्वास ठेवा तुम्ही.'

त्यानंतर तिचे काका समाधानाचे चार शब्द बोलले.

पण ती परतली ती मोठ्या जड अंतःकरणानेंच.

# १६

# उन्हाची पहिली तिरीप

दिवस भरभर चालले होते.

सकाळ होई. क्षितीजाक्षितीजांतून पक्षांचे थवे नादमधुर किलबिलाट करत उडत उडत जात. सूर्याचीं कोंवळीं किरणें खिडकींतून, दरवाजांतून लांबवर पसरत. तेव्हां त्यांचा आरक्त सोनेरी वर्ण व त्यांतील ऊब मोठी आल्हाददायक वाटे. पण जसजसा सूर्य घाईनें आपल्या प्रवासाला लागे तसतसा उष्मा अधिक भासून कपाळावरून, गालावरून, खाकेंतून, वक्षःस्थलावरून, घामाचे ओघळ वाहूं लागत. अशावेळीं वाऱ्याची जळती लहर सुद्धां मोठी आल्हाददायक वाटायची; परंतु हें फार वेळ चालत नसे तोंच अंगाची काहिली किंचित् कमी होऊं लागत असे. घशाला पडलेली कोरड घालवण्यासाठीं आचारी सरबताचे पेले तयार करण्याच्या तयारीला लागत. सूर्याचीं अखेरचीं किरणं पुन्हा एकवार विरुद्ध दिशेनें दारा खिडक्यांतून ओघळत त्यांचा आरक्त सुवर्णरंग पुन्हा एकवार मन आकर्षून घेई. अन् ज्यावेळीं सूर्य क्षितीजाखालीं उतरत असे त्यावेळीं धडाडणाऱ्या अग्निज्वालेप्रमाणें क्षितीज दिसूं लागे. सायंकाळीं घामानें भिजलेले कपडे जो तो बदली, पोमेड, स्नो व सुगंधी द्रव्याच्या बाटल्यांचीं झांकणें उघडलीं जात, केशभूषा नि

वेषभूषा होई. मग रहदारीला भरती येई. सगळ्या धांदलींत अन् गडबडींत जो तो मोठा उल्हासित दिसे. दिवसाचे पाणीदार डोळे काळ्या पापण्यांनीं मिटले जात, इकडेही कुणाचें लक्ष नसे. रस्त्यावरचे दिवे प्रज्वलित होत. फिरून आलेले लोक रेडिओवर आपापले आवडते कार्यक्रम घेत. रात्र अधिक काळीभोर होई. नक्षत्रांच्या चमकीकडे लक्ष द्यायला कुणाला सवड नसे. अन् आपापल्या मऊ शय्येवर सगळी दुनिया विश्रांतीसाठीं पडे. तेव्हां ज्यांचीं हृदयें विरहव्यथेनें जड झाली असत अशांचे जड श्वासोश्वास नि एकमेकांच्या कुशींत शिरलेल्या प्रेमिकांचे संथ नि ऊबदार श्वासोश्वास एकमेकांत मिसळून तरंगत तरंगत वर निघून जात.

दिवस भरभर चालले होते. परंतु दया उदास होती. तिची उदासीनता यत्किंचित्‌ही कमी होईना. प्रतापवर चाललेला खटला इतरांना कुतूहलाचा विषय होऊन बसला होता. परंतु दयेला त्याची विलक्षण भीति वाटत होती. अन् तिच्या शंकेखोर मनानें त्या खटल्याच्या निर्णयाबद्दल जो अंदाज बांधला होता तो तर...... .

पोलिसची बाजू मोठी बळकट होती. पोस्टमॉर्टेमच्या वेळीं आशेला एक महिना गेल्याचें उघडकीला आलें होतें. प्रताप गाडीजवळ बेशुद्ध असा पडलेला त्यांना आढळला तर आशा गाडींतल्या गाडींत चिरडून मेलेली आढळली. दोघांनीही मद्यपान केलें हेंही उघडकीला आलें होतें.

संध्येच्या नि दयेच्या मनःस्थितींत फारसा फरक नव्हता. त्या दोघींनाही त्या खटल्याच्या निर्णयाबद्दल काळजी वाटे. हलक्या आवाजांत त्या दोघीही त्याबद्दल बोलत. त्यावेळीं दोघींचेही पदर अश्रूंनीं ओलेचिंब होत.

अन् प्रताप !

तो पूर्णपणें निष्काळजी होता. बॅ. मुजुमदार सांगत त्याप्रमाणें प्रश्नांचीं उत्तरें देण्याची काळजी तो घेई एवढेंच काय तें ! ह्या व्यतिरिक्त तो बेफिकीर होता. तो उल्हासानें बोलत असे. नेहमीप्रमाणे स्नानाच्या वेळीं तो गाण्याच्या लकेरी छेडत असे. संध्येशीं तो मोकळेपणानें बोलत असे. नाही म्हणायला त्याच्यांत एक फरक स्पष्टपणें दिसून येण्यासारखा होता. तो हा कीं दयेशीं एकांतांत बोलण्याचें शक्य तो टाळीत असे. कां, कुणास ठाऊक पण दयेनें आपल्याकडे फारसें येऊं नये असेंही त्याला आंतल्या आंत फार फार वाटे !

त्या दिवशीं सायंकाळीं सहा वाजतां दया प्रतापकडे आली. त्यावेळीं तो बाहेर गेला होता. संध्या स्वेटर विणत होती.

संध्या त्यावेळीं दयेला मोहक दिसली. त्या प्रसन्नवेळीं तिची सांवळी कांती, डौलदार भुजलता, टपोरे डोळे अन् तिच्या ओठाच्या कोपऱ्याशीं चमकणारा दांत सगळेच तिला मोठं आकर्षक वाटलें अन् कधीं नव्हे एवढी आपुलकी तिला तिच्याबद्दल वाटूं लागली.

तिनें खुर्ची तिच्याजवळ ओढली व तिला म्हणाली,

' कुणासाठीं करतेस तूं हें ? '

तेव्हां संध्येनें एकवार बोटाला लोकर गुंडाळल्यासारखी केली अन् क्षणमात्र टाका थांबवून म्हणाली,

' प्रतापसाठीं. '

' मला नाही खरं वाटत हं. '

' मग ?'

' दुसऱ्या कुणाच्या अंगचं दिसतं हें. प्रताप कांहीं इतके लठ्ठ नाहीत.'

' मग तुझ्या अंगचं असेल. '

' इश्श. मी इतकी कां लठ्ठ आहे ? '

त्यांवर त्या दोघींही मोकळेपणानं हंसल्या.

त्यांचें हास्य क्षणमात्र मिटत नाहीं तोंच प्रताप आला. दयेकडे पाहून आश्चर्यानें तो म्हणाला,

' तूं आहेस. तरीच !'

' तरीच काय ? '

' वहिनीला इतक्या मोकळेपणानं हंसतांना मी अद्याप पाहिलं नव्हतं. '

' वा, वा तर ' असें कांहीं प्रतिकाराचे निष्फळ शद्ब संध्येनें उच्चारले.

त्यानंतर संध्येनें कॉफी टाकली. प्रताप थकून आलेला दिसत होता तरी कॉफी घेतल्याबरोबर कसल्या तरी कामाचें निमित्त करून तो कोट घालत घालत तेथून निघाला.

त्याचा अर्थ दयेला स्पष्टपणें समजला.

त्यानें दया उदास झाली. मग ती तेथें फार वेळ बसली नाहीं.

ती घरीं जाऊन पोंचली त्यावेळीं सायंकाळचे सात वाजले होते. सूर्य अस्ताला गेला होता. अन् बगिच्यातील सुरूचीं ताठ झाडें वाऱ्याचया लकेरीबरोबर क्षणभर थरारून जातांना दिसत होतीं.

गेल्याबरोबर तिनें गच्चीवर आरामखुर्ची मांडायला सांगितली. पुस्तकाच्या कपाटांतून एक कादंबरी काढली नि वाचण्याचा प्रयत्न ती करूं लागली.

पण तो प्रयत्न फसला.

तिनें किती पानें उलटलीं एवढेंच तिच्या लक्षांत होतें. तिनें प्रयत्नाची पराकाष्ठा केली परतु वाचनाकडे तिचें लक्ष लागेना. ओळी ओळींत नि शद्वा शद्वांत प्रताप नुक्ताच कोट घालत घालत जिना उतरून खालीं गेल्याचें चित्र तिला दिसे. पांढुरक्या आकाशावर चिमण्यांचा थवा चिवचिवाट करत तरंगतांना तिला दिसे. पण त्या चिवचिवाटांतूनही तिला प्रताप जिना उतरून गेला तो आवाज ऐकायला येई धड् धड् धड् धड्.........

जिना चढून खरोखरच कुणी तरी आलें पण दयेचें लक्ष तिकडे नव्हतें! ती आपल्याच विचारांत मग्न होती.

ती दचकली.

तिचे डोळे कुणी तरी झांकले. ती किंचाळली. तिच्या डोळयांवरची नाजूक बोटें तिनें चाचपली. डाव्या हातांत अंगठीचा स्पर्श झाला. तिनें हात चाचपत वर नेला आणि तिला त्या हातांत कंकण भासलें.

तिनें आपल्या सगळया मैत्रिणींचीं नांवें घेतलीं परंतु तिच्या डोळयांवरून बोटें निघेना. शेवटीं तिनें आपला पराजय कबूल केला.

तिनें डोळे उघडले. क्षणभर डोळयांपुढें अंधारी आल्यानें समोर कोण बसलें आहे तें समजलें नाहीं अन् ज्यावेळीं तें समजलें त्यावेळीं तिचा आपल्या डोळयांवर विश्वास बसेना!

ती ज्योति होती.

परंतु तिच्यांत किती बदल झाला होता ! कितीतरी लठ्ठ झाली होती ती. ती आतां गुजराथी पद्धतीनें साडी नेसली होती. पदर खुर्चीच्या पाठीवरून खालीं लोळत होता. तिचा लांबोळा स्तनप्रदेश, पोटापेक्षांही पुढें भासणारें उटीपोट दयेच्या प्रथम लक्षांत आलें.

दयेला वाटलें तिला दिवस गेले असावेत.

अतिशय आनंदित होऊन दया म्हणाली,

' वा, ग वा. अन् किती बदललीस तूं ज्योती ? अन् तूं आलीस तरी केव्हां '

ज्योती हंसली. ती म्हणाली,

' कालच आलें मी. '

' अन् ती कशी काय ? सहजच ? '

' सहजच ! छे बाई. सहज यायला इथं वेळ होता कुणाला ? मीं आलें त्याचं कारण अगदींच वेगळं आहे. '

दया गोंधळून गेली.

तें लक्षांत येऊन ज्योती म्हणाली,

' अग माझी मावशी मिस् आशा—'

तेव्हां दयेच्या ध्यानांत सगळें आलें.

' असं होय. तूं आशाची भाची आहेस हें विसरलें होतें मी. '

' विसरणं अगदीं साहजिक आहे. '

ज्योति अशा छद्मीपणानें हें बोलून गेली कीं त्यानें दयेला आनंद झाला. परंतु तो दिसूं नये म्हणून ज्योतीच्या दोन्ही दंडांना धरून हालवत ती म्हणाली, ' अलीकडे कान लांब झालेले दिसतात तुझे.'

त्यानंतर त्या दोघी मैत्रिणी बराच वेळपर्यंत मिस् आशेच्या अनपेक्षित मृत्यूबद्दल बोलत बसल्या.

त्यानंतर ज्योतीनें दुसरें दिवशीं सकाळीं मिस् आशेच्या बंगल्यावर येण्याचें आमंत्रण दिलें. नंतर ती तेथून गेली.

दुसरें दिवशीं सकाळीं आठ वाजण्याच्या सुमाराला दया ज्योतीकडे गेली त्यावेळीं ज्योती अन् ज्योतीचे यजमान प्रो. हृदयनाथ हे तिचीच वाट पाहत होते.

ज्योतीनें परस्परांची ओळख करून दिली. प्रो. हृदयनाथ हे रंगूनला एका कॉलेजांत प्रोफेसर होते.

पहिल्याच भेटींत दयेचें त्यांच्याबद्दल चांगलें मत झालें. ज्योतीच्या नि त्यांच्या वयांत अंतर बरेंच होतें. परंतु त्याचा फायदा ज्योतीला अधिक मिळत होता. एखाद्या दक्ष पित्याप्रमाणे ते ज्योतीची काळजी घेतांना दिसत होते अन् बहुमोल मोत्याचा कंठा जरूरीपुरताच बाहेर काढून मखमलीच्या डबींत बंद करून ठेवावा त्याप्रमाणें जरूर तेवढंच काम ते ज्योतीला करूं देत. एरव्हीं ज्योतीला त्यांच्यासमोर बसणें अगदीं जरूरीचे असे.

ज्योतीलाही आपल्या पतीचा मोठा अभिमान वाटत होता. अन् तें अगदींच साहजिक होतें.

प्रोफेसरसाहेबांनीं स्वतःसाठीं व आपल्या पत्नीसाठीं चहा तयार केला व ट्रे दयेकडे सरकवून ते म्हणाले,

'तुमची चहाची आवड मला माहित असती तर तुम्हांलाही मी तयार करून दिला असता.'

तेव्हां दया हंसली व म्हणाली,

'छे, छे उगीच तसदी घेऊं नका.'

त्यानंतर तिनें स्वतःसाठीं चहा तयार करून घेतला.

ते निरनिराळया विषयावर बोलत होते. इतक्यांत प्रोफेसरसाहेबांनीं दयेला विचारलें,

'काय हो......'

'हं.'

'हिच्या मावशीच्या मृत्यूबद्दल काय कल्पना आहे तुमची ?'

'म्हणजे ?'

'म्हणजे असं कीं हा अपघात म्हणावा म्हणतां ?'

'छे, हा अपघात खचित नाहीं.'

'मग ?'

त्यांना ते कोणत्या शद्बांत सांगावयाचें याचा दयेनें क्षणभर विचार केला व संध्येकडून तिला जो वृत्तांत समजला होता तो त्यांना निवेदन केला.

आपला हा वृत्तांत सांगणें आटोपल्यावर प्रोफेसरसाहेब मिस्कीलपणें हंसले असावे असा दयेला संशय आला.

तिचा तो संशय खरा होता.

प्रोफेसर हृदयनाथ मोकळेपणानें हंसले. दया जेव्हां जास्त जास्त आतुर नी व्याकुल दिसूं लागली तेव्हां मात्र प्रोफेसरसाहेबांनीं आपलें हास्य आटोपतें घेतलें.

'क्षमा करा हं दयाताई.'

'ती कशासाठीं?'

'मी आधींच सांगायला हवं होतं तुमचा प्रताप निर्दोष आहे म्हणून.'

'म्हणजे... .'

प्रोफेसरसाहेब हंसले. पँटच्या खिशांतून त्यांनीं चाव्यांचा घोस काढला. कोपऱ्याशी ठेवलेली पोर्टमँटो उघडून झांकणालगतच्या कप्यांतून छोटेसें पाकीट काढलें.

'हें तुमच्या आवडत्या मैत्रिणीला आलेलं तिच्या मावशीचं पत्र. पण मी तुम्हांला एकाच अटीवर तें देईन'

'कोणती?'

'तुम्ही उभयतां आमच्या रगूनला यायला हवं. काय? होय ना ग?'

प्रोफेसरसाहेबांनीं शेवटला प्रश्न आपल्या लाडक्या पत्नीला उद्देशून केला.

ज्योती काय म्हणाली तें दयेला कळलें नाहीं. तिनें तें पत्र घाईनें उघडलें व अधीर होऊन ती वाचू लागली

(मूळ पत्र इंग्रजीत असल्याने आवश्यक तेवढाच उतारा येथें दिला आहे)

"माझं आयुष्य एखाद्या किंमतवान ओव्हरकोटप्रमाणें होतं. त्यांत मी मोठी मोहक शोभून दिसे! पण इतरांना त्याची कल्पना नव्हती की ज्याला वाढ नाहीं असं आयुष्य स्त्रीला आवडत नाहीं. अन् माझं

हें आयुष्य असं होतं कीं त्याला वाढ लागणें अशक्य होतें. कसर लागण्याचा संभव मात्र दरक्षणाला होता. ज्योती ! फ्रँकनं मला सत्य दाखवलं, प्रतापनं तें पटवून दिलं. मी कुरूप आहे हें खरं ! अन् ह्या घाणेरड्या जीवनाचा शेवट लवकर व्हायला पाहिजे हेंही तितकंच खरं. म्हणून मी ठरवलं आहे आत्महत्त्या अशी करायची कीं माझी सुटका होऊन न्यायदानाच्या दिवसाची हांक ऐकण्यासाठी म्हणून मी थडग्यांत प्रतापच्या स्कंधावर मान टेकवून विश्रांति घेत राहीन ..

प्रोफेसरसाहेबांना मोठं आश्चर्य वाटलें.

ज्योती रडत होती.

दया रडत होती. पण दोघींच्याही रडण्याचा एकच अर्थ प्रोफेसरसाहेब मनाशीं लावत होते, ' छे, छे. या स्त्रियांचीं मनं हीं अशींच कोंवळी. '

गरीब बिचारे प्रोफेसर !

# १७

# थकलेले मुशाफर

आज प्रतापच्या खटल्याच्या निकालाची तारीख होती.

सकाळीं उठून संध्येशीं तो मोठ्या उल्हासानें बोलला. नेहमीप्रमाणें त्यानें दाढी घेतली. स्नान आटोपून तो बॅरिस्टर मुजुमदारांकडे गेला अन् तेथून तो सरळ त्याच्याच मोटारींतून. कोर्टांत गेला. त्या दिवशीं जेवणाकडे त्यांचं लक्ष नव्हतें.

कोर्टांत संध्या दया हजर होते.

खटल्याचा निकाल लागून प्रताप निरपराधी आहे हें सिद्ध झालें. फ्रँकची जीं पत्रें झडतींत हातीं आलीं त्यावरून आशेला फ्रँकपासून दिवस गेले हें सिद्ध झालें.

त्या दिवशीं सायकाळीं दया, संध्या अन् प्रताप प्रतापच्या निवासस्थानीं एकत्र आले होते.

ती संध्याकाळ मोठी आनंददायक होती. पश्चिम क्षितीजावर मावळत्या सूर्याचीं सोनेरीं किरणें आभाळाच्या असीम नीलरंगांत बेमालून मिसळली होती.

सूर्यप्रभा अर्धवट लुप्त होत आल्यामुळं वसुंधरेचें अर्धस्फुट सौंदर्य मनाला मोह पाडत होतें. रस्त्यावरची रहदारी वाढत जात होती.

त्या तिघांनाही काय बोलावें तें सुचेना ! संध्या कामाचें निमित्त करून आंत गेली.

तेव्हां तें लक्षांत येऊन दया व प्रताप दोघेही हंसले.

प्रताप म्हणाला,

' तुझे माझ्यावर फार उपकार झालेत दया.'

' काय हें ...'

दयेच्यानें पुढें बोलवेना. मनांत तरंगणारे अवडंबर आतां कोसळून पडणार हें उघड दिसत होतें. कारण तिच्या लांब पापण्या मांद्र झाल्या नि तिचे धक्क ओंठ थरथरूं लागले.

तिचा हात प्रतापनें आपल्या ओठांशीं घट्ट दाबला, त्यावेळीं ऊन ऊन असे टपोरे अश्रुबिंदू तिच्या हातांवर पडले.

दयेनें हात घाईनें काढून घेतला. प्रतापच्या मस्तकावर तळहात ठेवला आणि त्याच्या लांबसडक केसांतून तिनें बोटें फिरवलीं.

'आंग किती गरम आहे तुमचं. थांबा हं मी तुमच्या झोपण्यासाठीं व्यवस्था करतें.'

दया घाई घाईनें आंत गेली. प्रतापसाठीं बिछाना तयार केला अन् त्याला झोंपवलें. त्याच्या खाकेपर्यंत ब्लँकेट ओढून घेतलं. बिछान्याच्या कडेशीं ती बसली व हळूंहळूं त्याला थोपटूं लागली.

ताप सारखा वाढत गेला. रात्रीं अकरा वाजतां पपांच्या भीतीनें ती नाईलाजानें तेथून उठली तेव्हां प्रतापचा ताप एकशेंचार होता.

दुसरें दिवशीं ताप कायम होता.

तिसरं दिवशींही ताप उतरला नाहीं.

तेव्हां मात्र संध्या अतोनात घाबरली. त्या सगळया दिवसांत तिनें दहा वेळां तरी डॉ. डॅनियलला फोन केला. दयेला हजारदां बोलावण्याचा यत्न केला. परंतु दया तेथें नाहीं एवढेंच काय तें तिला कळलें.

त्याच दिवशीं रात्रीं आठ वाजतां डॉ. डॅनियलनें प्रतापला तपासलें. सगळ्या मुंबईभर त्याचें नांव गाजत होतें. जातीनें तो ज्यू होता. हिटलरच्या महत्वाकांक्षेची आंच त्याला बसून आपल्या मातृभूमीला त्याला सोडावें लागलें. असामान्य बुद्धिमत्ता दर्शविणारे त्याचे डोळे, मुद्रेवरचा गंभीर भाव, अस्फुट हंसतांना चमकणारे दांत, त्याचा लिंबासारखा पिवळाजर्द रंग पाहणाऱ्याच्या मनावर अनुकूल परिणाम करत असे. चालतांना तो आपल्या शरीराचा भार अंमळ उजवीकडे टाकत असे. मग त्याचें उजवें पाऊल थोडें कुठें कायमचें दुखावलें होतें कीं काय कुणास ठाऊक!

त्यानें स्टेथॅस्कोपची नळी खिशांत ठेवली. सोन्याच्या छड्याला लटकवलेलें घड्याळ पाहिलें व संध्येला थोडें बाजूला नेऊन म्हटलें,

' हें पहा बाई, जरा जास्त काळजी घ्यायला पाहिजे. ताप विषमाचा आहे अन् गृहस्थाची फुफ्फुसं मोठी खराब झालीं आहेत. सिगारेट फार ओढत असतात वाटतं ! '

' होय, आतां आतांशा.'

' ठीक आहे. काळजीचं कारण नाहीं. शुश्रूषा चांगली व्हायला पाहिजे. एक नर्स आतां पाठवून देतों म्हणजे बरं होईल. '

त्यानंतर डॉ डॅनियल निघून गेला.

डॉ. डॅनियलनें पाठवलेली नर्स एक ख्रिश्चन मुलगी होती. आपल्या कामांत ती विलक्षण मग्न असे. संध्येला थोडेसुद्धां पाहण्याची जरूर नव्हती. तरीही ती प्रतापच्या जवळ बसत असे. प्रतापच्या मोहक चेहऱ्यावरील सगळें सौंदर्य लुप्त झालें होतें. त्याचे टपोरे डोळे तापाच्या ग्लानीनें नेहमीच मिटले रहात. तो ज्यावेळीं खोकलत असे त्यावेळीं संध्येच्या जिवाचें पाणी होई. दिवसांतून ती कितीवेळा खुर्चीच्या हातावर मस्तक टेकवून रडत असे.

संध्येला त्याहीपेक्षां अधिक यातना कशानें होत असतील तर जिच्या गळ्यांत गळा घालून रडतां येईल अशी तिच्या जिवाभावाची मैत्रिण दया तिकडे फिरकली सुद्धां नव्हती. ती कुठें गेली अन् कां आली नाहीं याविषयीं चौकशी करायला तिला वेळही पण नव्हता!

असे सहा दिवस गेले.

सातव्या दिवशीं अमावस्या होती. सकाळपासून प्रताप अधिकाधिक बेचैन दिसूं लागला. त्याच्या डोळ्यांभोवतालचीं वर्तुळें अधिकाधिक काळी व तेलकट दिसूं लागलीं होतीं. आवाज क्षीण झाला होता. मोठ्या मुष्कीलीने तो खोकलत होता.

सकाळीं डॉ. डॅनियलनें आणखी एक नर्स पाठवली.

हवा कुंद झाली. घामाचे ओघळ वाहून संध्या अधिक बेचैन होत होती. आरामखुर्चीवर बसून ती प्रतापकडे पाहत होती.

मध्यरात्र निघून गेली.

वारा झुळुझुळु वाहावयास लागला मानसिक त्रासानें विलक्षण थकून गेलेल्या संध्येचा डोळा लागला. खुर्चीच्या खुर्चीवर ती झोपली.

डॉ. डॅनियल दुसरें दिवशीं मोठ्या सकाळींच आला त्यावेळीं संध्या खुर्चीत झोपली होती. त्यानें तिला उठवलें. संध्या खडबडून जागी झाली. तिला हंसून तो म्हणाला,

' गुडमॉर्निंग.'

संध्या गोंधळून गेली. बसल्या बसल्या आपल्याला झोंप लागली ह्याचें तिला वाईट वाटलें.

परंतु डॉक्टरनें मोकळेपणानें हास्य केलें. प्रतापला एकवार तपासलें, मोठ्या खुषींत येऊन संध्येला त्यानें चहाचा एक कप आपल्यासाठीं मागितला. मग तंबाखू आंगठ्यानें दाबून दाबून त्यानें आपला मोठा पाईप भरला. धुराचे लोट सोडत तो म्हणाला,

' आनंदाची गोष्ट आहे बाई. तुमचा प्रताप तुम्हांला परत मिळाला. धोक्याची वेळ निघून गेली.'

डॉ. डॅनियल जाऊन खालीं मोटारींत बसला. त्यानें वर पाहिलें. संध्या रडत होती. त्यालाही क्षणभर सुचेना. दवाखान्यांत जायचा विचार बदलवून ड्रायव्हरला तो एवढेंच म्हणाला,

' बंगल्यावरच ने.'

* * *

प्रताप बरा झाला खरा ! परंतु त्याचा अशक्तपणा गेला नाहीं. तो पिवळा दिसत होता. डोक्यावरचे त्याचे दाट केंस थोडेफार विरळ झाल्यासारखे दिसत होते. रोज तो नियमीतपणें डॉ. डॅनियलकडे संध्येबरोबर जात असे. आजही असाच तो संध्येबरोबर गेला होता. तेव्हां डॉक्टर म्हणाले,

' मि. प्रताप, आतां तुम्ही पूर्णपणें बरें झालांत. फक्त एकच करा. शक्य तितक्या लवकर मुंबई सोडून हवा बदलायला तुम्ही दूर कुठं तरी जा. मी माझ्या एका हिंदी डॉक्टर स्नेह्याजवळ चौकशी केली तेव्हां त्याच्या मतानं तुम्ही समुद्र-किनारीं मधुवन म्हणून एक खेडं आहे तिथं जाणं अधिक इष्ट आहे.'

'ठीक आहे. मग आज उद्यांच आम्ही निघतों तर ' संध्या घाईनें म्हणाली

' दॅट इज् गुड् ' असें ओठांतल्या ओठांत पुटपुटून डॉक्टर हंसला.

मधुवनाला जावयास प्रताप फारसा उल्हसित नव्हता. त्याचें कारण असें कीं गेल्या कितीतरी दिवसांत दया त्याला भेटली नव्हती, एकतर ती आजारी असली पाहिजे. अगर मुंबईबाहेर गेली असली पाहिजे हें उघड होतें. त्यापैकी खरें काय तें समजायला मार्ग नव्हता.

त्याच रात्रीं प्रतापनें कॅप्टनसाहेबांना फोन केला.

' हॅलो, हॅलो...'

' हॅलो, कोण ? '

' मी, प्रताप.'

' हं, कसं काय प्रताप...'

' हें पहा कॅप्टनसाहेब दया कुठं आहे हें समजेल काय मला ? '

' दया होय. तुम्हांला माहिती नाहीसं दिसतं, तिचं लग्नं झालं. प्रोफेसर आहे तिचा नवरा तिकडं आसामांत अन् हें पहा, हॅलो, हॅलो, हॅलो प्रताप, प्रताप......'

या बातमीवर प्रतापचा विश्वास बसणें शक्य नव्हतें ! पण विश्वास बसत नाहीं अशी मनाची समजूत केल्यानं कां हुरहूर थांबत असते. अन् मनाला न पटणाऱ्या अशा वाईटसाईट बातम्यांची गम्मत हीच असते कीं एकीकडे ती

बातमी सपशेल खोटी आहे अशी मन ग्वाही देत असतां दुसरीकडे त्या बातमीची धार हृदयाला खोल जखम करून देते.

या बातमीवर विश्वास ठेवावा कीं ठेऊ नये हें प्रतापला समजेना.

त्या हळव्या मनःस्थितींत तो संध्येबरोबर संध्याकाळीं पायींच हिंडत असतां सिगारेट घ्यायची त्याला लहर आली. आजारी पडला त्या क्षणापासून त्यानें सिगारेट सोडली होती हें खरें! परंतु त्याला सिगारेट घ्यावीशी वाटली. त्यानें संध्येला त्याप्रमाणें भीतभीत विचारलें अन् तिनें सम्मती देतांच तो जवळच्या इराण्याच्या हॉटेलांत शिरला.

गल्ल्यावर बसलेल्या इराण्याजवळून त्यानें पाकीट विकत घेतलें. तो परतणार इतक्यांत त्याची नजर कोपऱ्यांत खाद्यपेयांचा यथास्थित समाचार घेणाऱ्या एका मुसलमान तरुणाकडे गेली.

तो मौसिन अली होता.

प्रताप त्याचेजवळ खुर्चीवर बसला तेव्हां किंचित् हंसून त्यानें ‘ बंदगी ’ केली

प्रतापनें विचारलें..

‘ अली.’

‘ जी.’

‘ एक काम करशील ? ’

‘ जी. बंदा आपला चाकर आहे.’

‘ दया कुठें गेली ?’

मौसिनने प्रतापकडे पाहिलें. व डाव्या हातातील रोटीचा तुकडा मटनच्या प्लेटमध्यें बुडवला.

प्रतापनें पैशाचें पाकीट काढून त्यांतून दहाची एक नोट मौसिनला दिली. तेव्हां ती खिशांत घालून तो म्हणाला,

‘ साहेब, आपल्याजवळून कां बक्षिसी घ्यायची ?’

‘ मग सांग तर.’

मौसिनच्या सांगण्यावरून त्याला इतकेंच समजलें कीं दयेनें प्रतापच्या सुटकेला जी अप्रत्यक्ष मदत केली ती कॅप्टसाहेबांना मुळीसुद्धां आवडली नाहीं.

तिच्या इच्छेविरुद्ध त्यांनी तिला कुठंतरी पाठवून दिलं. कुठं हें त्याला निश्चित माहित नव्हतें ! मात्र हें नक्की की दयेचा विवाह झाला नव्हता.

हे सगळें सांगितल्यानंतर त्यानें 'आदाब अर्ज' केला व हॉटेल सोडून गेला.

काय करावें तें प्रतापला सुचेना ! तो खिन्न झाला. त्याचें व्यथित चित्त अधिकाधिक उदासिन होऊं लागलें.

मग संध्येनें प्रतापच्या सम्मतीची वाट पाहिली नाहीं. तिनें मधुवनाला जाण्याचें निश्चित ठरवलें. आवश्यक सामानाची खरेदी केली. प्रतापसाठीं टॉनिकच्या बाटल्या व लोकरीचे कांहीं कपडे खरेदी केले. डॉक्टर डॅनियलच्या ओळखीच्या डॉक्टरांकडून तिनें मधुवनांत आपल्याला राहण्यासाठीं एक छानपैकीं बंगला नक्की करून घेतला.

एके दिवशीं सायंकाळीं पांच वाजतां मधुवनाच्या दर्यांत जी बोट येऊन उभी राहिली, त्या बोटींतून तेथील सुमारें पांचसहा उतारू पडावांत बसून किनाऱ्यावर दाखल झाले. त्यांत प्रताप व संध्या दोघेही होते

सूर्य क्षितिजाकडे अमळ उदासपणें जात होता. प्रतापनें पाहिलें तो किनाऱ्यावरून मधुवन गांवांतील माड्या दिसत नव्हत्या. तें गांव हिरव्यागर्द माडांच्या आडांच्या राईंत लपून गेलें होतें. घोड्याच्या गाडींत बसून प्रताप व संध्या ज्यावेळीं मधुवन गावांत जाऊं लागले तेव्हां बराच वेळपर्यंत त्या गावांतील घरांनें त्याला दर्शन झालें नाहीं.

समुद्र, त्याच्या कांठचें पांढरेंशुभ्र पुलीन व नंतर सुरूच्या झाडांचीं राई सुरू होत होती. किनाऱ्यावर इतस्ततः नारळाचीं झाडें होतीं. अन् त्यांच्या झावळ्या निश्चल होत्या. सुरूच्या शंखाकृती झाडांच्यामध्यें केवड्याच्या झाडाचें बन आढळून येत होतें. त्यांची गाडी मधुवनाजवळ आली तेव्हां केवड्याचा गोड वास प्रतापला येऊन त्या गांवाच्या नांवाची यथार्थता त्याला अक्षरशः पटली.

गांवाच्या सुरुवातीला दुतर्फा माडांच्या पानांनीं शाकारलेल्या झोपड्या होत्या. रस्ते अरुंद होते व रस्त्यावर लाल माती विपुल होती. जवळ जवळ सगळ्याच बंगल्याभोंवतीं त्याला छोटे छोटे बगीचे दिसले. नारळाचीं ताठ झाडें, सूर्यप्रकाशांत चमकणारीं केळींचीं रुंद पानें अन काजूचीं हिरवीं हिरवीं झुडुपं त्याला आवडलीं. रस्त्यावरून दरवळणाऱ्या मधुमालतीच्या वासानें त्याचें मन प्रसन्न केलें.

तें गांव त्याला आवडलं.

त्यांचा बंगलाही गांवाच्या बाहेर एकांतांत होता. सकाळीं सूर्योदयाबरोबर उठून संध्येबरोबर तो वाळवंटावर समुद्राकिनारीं फिरायला जाई. दुपारच्या जेवणा-नंतर तो झोप घेई. मग तो बराच वेळ वाचत असे. सायंकाळीं रात्रीं पुन्हा तो लांब रस्त्यानें फिरायला जाई. मग तो बराच लवकर झोंपत असे.

असा जवळ जवळ एक आठवडा गेला. प्रताप वरून तरी मोठा आनंदी नि समाधानी वृत्ती दाखवत असे. खूप खावें, फिरावेंही खूप अन् वाटेल तितकें वाचन अशा त्याच्या निष्काळजी आयुष्यांत त्याला फारसा आनंद वाटत नव्हता हें खरें! तथापि त्यांत फारशी दगदगही नव्हती. त्याची प्रकृती चांगली सुधरूं लागली. जिभेला चांगली चव आली, जेवण चांगलें जाऊं लागलं, थकवा कमी कमी वाटूं लागला, झोंप चांगली येऊं लागली, खोकला पूर्णपणें बसला. श्वासोश्वास संथ नि खोल असा होऊं लागला.

संध्येलाही फार आनंद झाला. तो आनंद एका रात्रीं तिनें त्याच्याजवळ बोलून दाखवला.

संध्या तेथं आल्यापासून स्वतःच हातानें स्वयंपाक करत असे. कारण प्रतापच्या पथ्याचें भोजन स्वयंपाक्याला नीटसें जमणें शक्य नव्हतें!

त्यारात्रीं नेहमीप्रमाणें संध्येनें दोन ताटें वाढली व प्रतापला जेवण्यासाठीं हांक मारली. प्रतापनें दोन पोळ्या घेतल्यानंतर तिसरी पोळी तो नको नको म्हणत असता तिनें त्याच्या पानांत घातली.

तेव्हां तो हंसून थट्टेनें म्हणाला,

'वहिनी पुन्हा आजारी पाडणार तुम्ही मला.'

'पडलांत तरी आतां भिण्याचं कारण नाहीं मला.'

'तें कसं काय?'

'डॅनियल नाहीं तर नाहीं निदान कॅप्टन मंत्री तर कुठं गेलेच नाहीत.'

वास्तविक संध्येनें कॅप्टन मंत्रीचा उल्लेख केवळ प्रतापला हंसवण्यासाठीं केला होता. परंतु त्याचा परिणाम अनपेक्षित झाला अन् तेथील त्या मुक्कामांत कधीं नव्हे एवढी दयेची त्याला आठवण आली. आंचवून तो बिछान्यावर येऊन पडला व अर्धवट सोडलेली कादंबरी त्यानें पुरी करण्यासाठीं म्हणून घेतली.

परंतु तिकडे त्याचें लक्ष लागेना.

त्याला दयेची मूर्ति डोळ्यासमोर दिसत होती. दयेचं मित व मधुर भाषण त्याच्या कानांत सारखें घुमत होतें.

सगळी रात्र तो बिछान्यावर तळमळत पडला होता. परंतु त्या विचारांचें जाळें तोडणें शक्य नाहीं हें त्याला कळून चुकलें.

घड्याळाची टिक् टिक् चालली होती. तासाचे व अर्ध्या तासाचे टोले पडत होते. त्यावेळीं लंबकाच्या कमानींचा खर्र असा विचित्र आवाज होई. तो प्रतापला कर्णकटु वाटत होता.

सकाळीं पांचाचे टोले पडले तरी प्रतापला झोंप आली नाही. समुद्राच्या लाटांचा ममरध्वनि पूर्वीप्रमाणेंच ऐकूं येत होता. फरक इतकाच कीं त्या आवाजांत गांवांत इतस्ततः जे रहाट चालले होते त्यांचा कुं कुं असा आवाज, कोंबड्यांचें आरवणें, पक्षांचा मधुर किलबिलाट, दूरवर बगिच्यांतून चाललेल्या मोटांचें आवाज, मिसळले होते.

मग बिछान्यावर पडून राहण्याचा प्रतापला कंटाळा आला. त्यानें आपलें तोंड स्वच्छ धुतलें, हातांत काठी घेतली व अंगांत स्वेटर घातलें कारण बाहेर थंडी जाणवत होती.

दुतर्फा लावलेल्या सुरूच्या झाडांमधून तो समुद्रकिनाऱ्यावर आला. चंद्राची फिक्की किरणें समुद्राच्या लाटांवर नाचत होतीं. मचव्यांची किनाऱ्यावर गर्दी झाली होती. निळ्या पार्श्वभूमीवर वाऱ्यानें फुगीर झालेली पांढरी स्वच्छ शिडें मोठीं मोहक दिसत होतीं.

वाळवंटावर कुणी नव्हतें. रेतीवर नाही म्हणायला एक मुलगी पडली होती. पांढऱ्या शुभ्र रेतीवर तिच्या पातळाचा पदर इतस्ततः उडत होता. तिनें उशीसारखा डोक्याखालीं डावा हात घेतला होता.

प्रतापनें निरखून पाहिलें. निःसंशय ती दयाच होती.

तो जवळ जवळ ओरडलाच,

'दया, दया.'

दया उठून बसली. आश्चर्यानें ती उद्गारली,

'खरंच...प्रताप आहात तुम्ही ?'

प्रतापच्या मांडीवर डोकें टेकवून दया रडूं लागली. प्रतापनें तिचें मस्तक थोपटलें.

दयेची आत्या मधुवर्नी शिक्षकिणीचा व्यवसाय करत होती. तिच्या इच्छेविरुद्ध तिच्या पपांनी जबरदस्तीनें तिला पाठवून दिलें. त्यानंतर एक दोन दिवसांत त्यांनी प्रतापबद्दल अमंगळ वार्ता तिला कळवली. दया रडली पण त्याचा उपयोग कांही नव्हता. तिच्याजवळ एक दमडीही नव्हती. तेथून निघून जायचें कसें हे तिला समजत नव्हतें. दया शांत झाल्यानंतर त्या स्वच्छ रेतीवर ते दोघेंही कांही वेळ पडले.

मग दया म्हणाली.

'प्रताप......'

'काय ?'

'तुमच्याबरोबर येणार मी. फार थकून गेले आहे.'

'मीही तुला सोडणं कसं शक्य आहे ? मीही विलक्षण थकून गेलो आहे.'

'मला वाटतं आपली भेट करण्यांत या दैवाचा एक हेतू उघड उघड दिसतो.'

'तो कोणता ?'

'तुमच्या आमच्या दुर्दैवाची अखेर झाली.'

प्रताप हंसला व म्हणाला,

'वेडी आहेस तूं. दुर्दैवाला शेवट तरी असतो कां ? दुःख असो की सुख असो आयुष्यांत जसं आहे तसा त्याचा स्वीकार करायचा यापेक्षां तुझ्या माझ्या हातांत जास्त आहे तरी काय ?'

प्रताप उठून बसला.

मनस्तापाचा असह्य भार त्याच्या हृदयावरून उतरला. दयेतील व आपल्यांतील अंतर त्याला त्या सुखाचें कालीं मोठें अशुभ वाटलें.

त्यानें दयेच्या कपाळाचें, ओठांचें, हनुवटीचें व कंठभागाच्या नाजुक खळीचें चुंबन घेतलें. तिच्या मऊ व अर्धव्यक्त वक्षःस्थळाच्या उबेत सुखाच्या तंद्रीत त्यानें आपलें तोंड झांकलें.

लेखन काल: २०-११-३९ ते २५-४-४०